


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन-समिती :** अशोक रा. केळकर (प्रमुख), कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए-२ परिमल, १२३९-ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ५२००९)
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** ए-२ परिमल, १२३९-ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ५२००९)
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी विजया देव / मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

संपादकीय

# भाषा आणि चळवळी

'भाषा आणि चळवळी' हे शब्द उच्चारल्यानंतर सर्वप्रथम आठवतात त्या भाषाशुद्धीच्या चळवळी. मराठेशाहीच्या स्थापनेच्या वेळी शिवाजीने रघुनाथ नारायण हणमंते याच्याकडून 'राज्य–व्यवहारकोश' हा पारिभाषिक फार्सी–संस्कृत कोश तयार करून घेतला. भाषाशुद्धीच्या दृष्टीने झालेला मराठीतला हा पहिला महत्त्वाचा प्रयत्न. असे करण्याची गरज शिवाजीला भासली कारण त्या काळी राज्यव्यवहाराच्या भाषेवर फार्सीचा जबरदस्त प्रभाव होता. तीन–चारशे वर्षे महाराष्ट्रावर मुसलमानांचा अंमल असल्यामुळे असे होणे स्वाभाविक होते. एकनाथांनी लिहिलेल्या 'अर्जदास्त' या काव्यबद्ध प्रकरणात ५० टक्के शब्द फार्सी आहेत. वि. का. राजवाड्यांनी दिलेला ऐतिहासिक पत्राचा पुढील नमुना पाहिला तर मराठीवर किती मोठ्या प्रमाणात फार्सीचे आक्रमण झाले होते, हे लक्षात येईल :–

"मसरुल अनाम राजश्री नारो भिकाजी सुभेदार व कारकून सरदेसमुखी सरकार महालहाय तलकोकन प्रती राजश्री शिवाजी राजे सु ।। तिसा सितैन अलफ. (मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड २०, पृष्ठ ३०२)

भाषिक आदान भाषांना समृद्ध बनवते याविषयी दुमत नाही. पण जेव्हा एक भाषा दुसरीचे अस्तित्व गिळून टाकू लागते तेव्हा तो चिंतेचा विषय बनतो. संस्कृत-वर जादा भिस्त ठेवल्यामुळे हणमंते यांचा प्रयत्न मर्यादित प्रमाणातच यशस्वी झाला. पण या प्रयत्नामुळे एकतर भाषाशुद्धीची जाणीव निर्माण झाली आणि दुसरे म्हणजे राज्यव्यवहाराच्या भाषेतील फार्सी शब्दांचे प्रमाण दिवसेंदिवस घटत गेले. इतिहासाचार्य राजवाड्यांनी निवडलेल्या १६२८, १६७७ व १७२८ या सालातील तीन उताऱ्यांत फार्सी शब्द अनुक्रमे ८५.६, ३७.८ व ६.३ टक्के आहेत.

पेशवाई बुडाल्यानंतर इंग्रजांचे राज्य आले. इंग्रजी शासनव्यवहाराची आणि शिक्षणाची भाषा झाली. त्यातून मराठीने एक नवेच रूप धारण केले. मराठी गद्याचा हा इंग्रजी अवतार होता. "टेंडरसोबत जोडलेल्या ले–आऊट प्लॅनला अनुरूप असे फ्लॅटचे स्वत: केलेले डिझाईनसुद्धा टेंडरर्सनी सादर करण्यास हरकत नाही –" १९६३ साली मुंबई महा–नगरपालिकेने काढलेल्या पत्रकातील ही ही भाषा म्हणजे मराठीच्या नव्या रूपाचे ढळढळीत उदाहरण.

इंग्रजीचे मराठीवर होणारे हे आक्रमण भाषाशुद्धी आणि भाषाविकास या विषयी जागरूक राहाणाऱ्या विचारवंतांसाठी गेली अनेक वर्षे एक डोकेदुखी होऊन





अनुक्रमणिका

बसले आहे. १९२६ साली इतिहासाचार्य राजवाडे यांनी शारदोपासक संमेलनाच्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून मराठीच्या भवितव्याचा प्रश्न उपस्थित केला आणि "येणे प्रमाणे मराठीची तोंडदाबणी आणीक पाच–पंचवीस वर्षे होत गेल्यास लवकरच सर्व महाराष्ट्र इंग्रजी भाषा, शुद्ध किंवा अपभ्रष्ट अशी हांगकांग मधील पीज्यन इंग्लिशप्रमाणे बोलू लागेल असा अंदाज दिसतो" असे मत व्यक्त केले. श्री. कृ. कोल्हटकर, श्रीधर व्यंकटेश केतकर, भा. वि. वरेरकर, विठ्ठल रामजी शिंदे अशा विद्वानांनी नंतर या प्रश्नावर लेखन केले. स्वा. सावरकर आणि माधव ज्युलियन यांनी केलेल्या भाषाशुद्धीच्या चळवळींमुळे या प्रश्नाला अधिक टोक आले. आज हे टोक कमी झाले आहे. वृत्तपत्रांतील वाचकांच्या पत्रव्यवहारातून या प्रश्नाचे उद्रेक अधूनमधून होतात. भाषाशुद्धीच्या चळवळी महत्त्वाच्या असल्या तरी केवळ भाषाशुद्धीच्या चळवळी करून भाषा विकसित होत नाही. भाषेचा विकास व्हायचा असेल तर ती भाषा बोलणाऱ्या समाजाला निजभाषेबद्दल प्रेम असावे लागते, ती भाषा बोलणारा समाज भौतिक आणि सांस्कृतिक दृष्टचा समृद्ध असावा लागतो आणि ती विशिष्ट भाषा शासनाची आणि लोकव्यवहाराची भाषा असावी अशी शासनाची मनापासून तीव्र इच्छा असावी लागते. या तिन्ही आधाऱ्यांवर मराठीचे चित्र फारसे आशादायक नाही. भाषिक चळवळी करणाऱ्या गटांचा उत्साह विझल्यासारखा होण्यामागे हे महत्त्वाचे कारण आहे. अशा विझलेल्या कार्यकर्त्यांना मग 'जागतिक मराठी परिषदे'मुळे निर्माण झालेला उत्साह वरवरचा वाटतो. दुसरीकडे इंग्रजी माध्यमाच्या शाळांकडून होणारे अतिक्रमण मराठी ही 'प्रेमपत्र' लिहिण्याची तरी भाषा राहील की नाही, अशी भीती त्यांच्या मनात निर्माण करत राहाते.

भाषेच्या संदर्भात 'भाषाशुद्धी'पेक्षा वेगळ्या स्वरूपाच्याही काही चळवळी होऊ शकतात. भाषेचे मौखिक रूप नेहमी प्रवाही आणि परिवर्तनशील असते, तुलनेने भाषेचे लेखन स्थिर असते. यामुळे कालान्तराने भाषेचे उच्चारण आणि लेखन यात फरक पडत जातो आणि शुद्धलेखनाच्या चळवळी निर्माण होतात. विसाव्या शतकाच्या आरंभी साने, हातवळणे, गोडबोले इत्यादी अभ्यासकांनी मराठीच्या लेखनव्यवस्थेत बदल झाला पाहिजे असा आग्रह धरला. त्यानंतर १९२८ च्या सुमाराला न. चिं. केळकर यांनी केसरीतून लेखन करून या वादाला तोंड फोडले. १९३२ साली महाराष्ट्र साहित्य परिषदेने लेखनाचे नवे नियम तयार केले. मात्र ते प्रचारात आले नाहीत. त्यावर वेगवेगळ्या स्वरूपात चर्चा होत राहिली. महाराष्ट्रातील साहित्यसंस्थांच्या एकीकरणानंतर १९५८ साली 'मराठी साहित्य महामंडळा'ची स्थापना झाली. त्यानंतर १९६१ साली शुद्धलेखनाचे नवे नियम तयार झाले व सर्वमान्य झाले. या नियमांमध्ये काही त्रुटी असल्याचे जाणवत

असले तरी या प्रश्नाची तीव्रता आता कमी झाली आहे.

भाषा आणि बोली यांच्या गुंतागुंतीच्या परस्परसंबंधातून काही वेळा भाषाविषयक चळवळी जन्म घेतात. उदाहरणार्थ अहिराणी आणि डांगी या मराठीच्या बोली की गुजरातीच्या हा प्रश्न. यातील अहिराणीबद्दलचा वाद फारसा चिघळला नाही. डांगीबद्दल जी चळवळ झाली ती भाषिक पातळीपेक्षा राजकीय पातळीवर जास्त खेळली गेली. त्यामुळे तो प्रश्न डांगी भाषकांचा न राहाता हितसंबंधी राजकारण्यांचा झाला. 'कोकणी–मराठी' वादाच्या बाबतीत मात्र कोकणी भाषकांची अस्मिता जागी झाल्यामुळे बऱ्याच अंशी हा वाद लोकांमध्ये खेळला गेला.

भाषिक चळवळींबद्दलची एक कठोर वस्तुस्थिती आपण सर्वांनी लक्षात घ्यायला पाहिजे. या चळवळींना आपण 'चळवळी' म्हणत असलो तरी प्रत्यक्षात यातील बरेचसे प्रश्न केवळ 'भाषिक वाद'च राहिले आणि ते भाषेबद्दल जागरूक राहाणाऱ्या मूठभर अभ्यासकांमध्ये आणि विचारवंतांमध्येच खेळले गेले. प्रत्येक सर्वसामान्य माणूस भाषा वापरत असतो, भाषेशिवाय त्याचे दैनंदिन व्यवहार अडत असतात हे खरे आहे. पण शेवटी भाषिक प्रश्न म्हणजे काही 'रोजी रोटीचे सवाल' नसतात. त्यामुळे मोठ्या संख्येने लोक भाषिक चळवळीत उतरत नाहीत. भाषाविषयक प्रश्नांची तड अनेक वर्षे न लागण्यामागे शासनाच्या दिरंगाईइतकेच लोकांची अनास्था हेही कारण आहे. आपल्यासारख्या भौतिक दृष्ट्या अविकसित असलेल्या समाजात 'रोजी रोटी'च्या सवालांपलीकडे बघण्याइतकी सवड कुणाला नसते आणि समाजाला 'रोजीरोटी–पलीकडे' नेण्याचे प्रयत्नही मनापासून झालेले नसतात, हेही आपण समजून घ्यायला पाहिजे. बहुसंख्य वेळा भाषिक चळवळी अल्पसंख्याकांच्याच राहतात. आपल्या अल्पसंख्याकत्वाविषयी अशा चळवळीतील कार्यकर्त्यांना फार हळवे राहून चालत नाही.

दुसरीकडे इतिहास अशीही साक्ष देतो की भाषेचा आधार घेऊन मोठी जनआंदोलने उभारली जातात. प्रांतीय आणि राष्ट्रीय अस्मितेचा अंगार फुलवण्यासाठी भाषा हे महत्त्वाचे साधन ठरते. भारतापुरतेच पाहायचे तर 'बंगाली राष्ट्रवाद' आणि 'तेलुगू देशम्'ची चळवळ यांना भाषाप्रेमाचा आधार आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीची पहिली मागणी मुंबईचा महाराष्ट्रात समावेश ही असली तरी मराठीवरील प्रेम आणि मराठीला राजभाषेचा किताब मिळवून देण्याची ईर्षा यांचा भावनिक आधार या चळवळीला होताच. नेतृत्व कुशल असेल तर भाषाप्रेमाचा आधार घेऊन मोठी आंदोलने उभारणे शक्य असते. मात्र इथे एक लक्षात घ्यायला हवे की, ही जनआंदोलने केवळ भाषिक प्रश्नामुळे किंवा भाषाप्रेमामुळे उभी राहिलेली नसतात. विशिष्ट भाषा बोलणाऱ्या समाजाचे भौतिक पातळीवर शोषण होते किंवा त्या भाषिक समाजाला ती भाषा बोलणारा समाज

म्हणून दुय्यमत्व दिले जाते तेव्हाच भाषेचा आधार घेऊन मोठे आंदोलन पेटवून देणे शक्य असते. म्हणजे कारणे भौतिक असतात, कधी वांशिक किंवा धार्मिक असतात, आवाहन मात्र भाषिक असते. भौतिक अपेक्षा पूर्ण होत नाहीत असे लक्षात आले, व्यवस्थापनातील गोंधळ आणि भ्रष्टाचार उघड झाला तर भाषेचा आधार घेऊन उभ्या राहिलेल्या चळवळीला अथवा शासनाला उलथून टाकायलाही लोक मागेपुढे पहात नाहीत. नुकत्याच झालेल्या लोकसभा–विधानसभेच्या निवडणुकीत 'तेलुगू देशम 'च्या सरकारऐवजी आंध्रमध्ये काँग्रेसला मिळालेले बहुमत यादृष्टीने फार बोलके आहे.

'मराठी भाषा–मराठी बाणा ' या घोषणा घेऊन गेल्या काही वर्षात शिवसेनेने महाराष्ट्रात आपले स्थान बळकट केले. शिवसेनेला मिळणाऱ्या प्रतिसादामागे भाषाप्रेमापेक्षा मराठी माणसाला महाराष्ट्रात दिले गेलेले दुय्यमत्व आणि त्याची नोकऱ्यांतून आणि व्यापारातून झालेली हकालपट्टी ही भौतिक कारणे अधिक प्रभावी आहेत. शिवसेनेपाशी समताधिष्ठित आर्थिक–सामाजिक भूमिका नसल्यामुळे आणि तिचे धोरण अराजकी, विद्वेषी असल्यामुळे शिवसेना भावनिकदृष्ट्या लोकांना भडकवू शकेल पण त्यांचे प्रश्न सोडवू शकणार नाही. अशा संघटनेकडुन पेटवल्या जाणाऱ्या भाषिक चळवळीकडे भाषाअभ्यासकांना अत्यंत जागरूकपणे बघावे लागते आणि पुढे येणाऱ्या अराजकी वळणांना वेळीच थोपवावे लागते. स्वभाषाप्रेम म्हणजे परभाषेचा, परप्रांतीयांचा आणि परधर्माचा द्वेष नाही.

भाषिक चळवळी भाषेतील अंतर्गत समतोल ढळल्यामुळे किंवा भाषिक अस्मितेतून निर्माण होतात. भाषा समाजात अस्तित्वात आलेली असल्याने आणि समाजाशी तिचा अतूट संबंध असल्याने काहीवेळा सामाजिक चळवळीसुद्धा भाषेकडे बघण्याचे नवे दृष्टिकोन देऊन जातात. १९६० नंतर ब्राह्मणेतर आणि तळागाळातले समाज साहित्यनिर्मितीच्या प्रक्रियेत उतरले आणि साहित्यिक-सामाजिक चळवळी करू लागले. आपल्याबरोबर ते आपापल्या बोली घेऊन आले. यामुळे लेखनावर असलेल्या प्रमाणभाषेच्या अधिसत्तेला शह मिळाला. " ३॥ टक्क्यांची भाषा आणि ३॥ टक्क्यांचे साहित्य " या लक्ष्मण मान्यांच्या उद्गारामुळे भाषा–बोली संबंध, महाराष्ट्रातील साक्षरतेचे अल्पप्रमाण, मराठी साहित्यावर मूठभर प्रस्थापितांची असलेली मक्तेदारी अशा प्रश्नांकडे समाजाचे लक्ष वेधले गेले.

१९६० नंतर स्त्री–मुक्तीची चळवळ पाश्चात्य जगात तीव्र होऊ लागली. त्यातून 'स्त्रीवादी समीक्षा ' या नव्या अभ्यासशाखेची निर्मिती झाली. स्त्रिया साहित्यामध्ये जी भाषा वापरतात तिचे आदर्श पुरुषांनी घालून दिलेले आहेत. तेव्हा पुरुषांनी घालून दिलेले लेखनाचे व भाषेचे आदर्श धुडकावून देऊन स्त्रियांनी स्वतःच्या भाषेत लेखन केले पाहिजे, असा आग्रह कट्टर स्त्रीवादी गटाकडून धरला जाऊ





अनुक्रमणिका

लागला. स्त्रीचे दुय्यम सामाजिक स्थान व तिचे पातिव्रत्य यांना आधारभूत मानून तयार झालेले वाक्प्रचार, सन्मानदर्शक शब्द आणि शिव्या यांचे स्त्री-मुक्तीवाद्यांकडून पुनर्मूल्यमापन आणि निषेध होऊ लागला. ( 'भाषा आणि जीवन'च्या वर्ष २ अंक ३ मध्ये या स्वरूपाचे दोन लेख आलेले आहेत. )

परवा पुस्तकाच्या दुकानाबाहेर मांडलेली जुनी पुस्तके चाळताना एक गंमतीदार पुस्तक माझ्या हाती आले. त्याचे नाव होते 'स्त्रियांसाठी इंग्रजी' पुण्यातील एका जुन्या नावाजलेल्या इंग्रजी शिक्षकाने ते लिहिलेले होते. हे पुस्तक समोर आल्या-नंतर स्त्री–पुरुष समानता मानणाऱ्या माझ्या मनाची पहिली ( तीव्र आणि बरीचशी कटू ) प्रतिक्रिया अशी की 'स्त्रियांसाठी आणि पुरुषांसाठी असे काही वेगळे इंग्रजी असते का ?' पुस्तकातले विषय वाचल्यानंतर मी चक्रावूनच गेले. पार्टीमध्ये इंग्रजी कसे बोलावे, पाककृतींबद्दल इंग्रजीतून कसे सांगावे, कपडे आणि सौंदर्यप्रसाधनांबद्दल इंग्रजीतून चर्चा कशी करावी – अशा तऱ्हेचे संवाद त्या पुस्त-कात स्त्रियांचे इंग्रजी 'शिक्षण' करण्यासाठी दिलेले होते. स्त्रियांनी शोभिवंत बाहुलीप्रमाणे पतीच्या छायेत वावरावे आणि पाककृती–सौंदर्यप्रसाधन इत्यादी-विषयीच बोलत राहावे ही स्त्रीत्वाची समाजनिर्मित ( खरे तर पुरुषनिर्मित ) संकल्पना स्त्रीमुक्ती चळवळीने केव्हाच बाद केली आहे. ही चळवळ झाली नसती तर या पुस्तकाविरुद्धची कडवट प्रतिक्रिया माझ्या मनात निर्माण झाली असती का ? अशा तऱ्हेचा भाषाशिक्षणाचा अभ्यासक्रम तयार करण्यापूर्वी यापुढे भाषा-शिक्षकांनाही दहा वेळा विचार करावा लागेल; तोही या चळवळीमुळेच.

**–अंजली सोमण**

# मराठी लेखनातील विरामचिह्नांचा उपयोग

अशोक रा. केळकर

## मराठी लेखनात येणारी चिह्ने

मराठी भाषा देवनागरी लिपीत लिहितात. ती लिहिताना वर्णचिह्नांखेरीज इतरही अनेक चिह्ने वापरली जातात. त्यांत विरामचिह्ने येतात तशी इतरही चिह्ने येतात. या सर्वच चिह्नांचा प्रथम आढावा घेऊ आणि त्यांची गटवार यादी करू.

### विरामचिह्ने

, स्वल्पविराम
; अर्धविराम
: अपूर्णविराम (दोन टिंबे)
. पूर्णविराम
... खंडविराम (तीन टिंबे)
? प्रश्नचिह्न
! उद्‌गारचिह्न
। दंड
।। दुहेरी दंड

- सयोगीचिह्न
— वियोगीचिह्न (डॅश)
/ विकल्पचिह्न (तिरपी रेघ)
‘ ’ एकेरी अवतरण चिह्ने
“ ” दुहेरी अवतरणचिह्ने
( ) कंसकोष्ठक (गोल कंस)
{ } महिरपी कोष्ठक (महिरपी कंस)
[ ] चौकोनी कोष्ठक (चौकोनी कंस)

### संदर्भचिह्ने

* तारकाचिह्न (फुली)
† क्रूसचिह्न
‡ दुहेरी क्रूसचिह्न
" यथोपरिचिह्न (डिटोची खूण)

§ काकपदचिह्न
० संक्षेपचिह्न (पोकळ शून्य)
’ लोपचिह्न (अपॉस्ट्रफी)
— अधोरेखा, अवधारणचिह्न

### भेदकचिह्ने

् विराम, पायमोड
ऽ द्विखंड, अवग्रहचिह्न
ऽऽ दुहेरी द्विखंड, दुहेरी अवग्रहचिह्न

### मांडणीचे विशेष

जोडून लिहिणे
शब्द तोडून लिहिणे
परिच्छेद तोडणे
जादा समास सोडणे (सेट् ऑफ)

आपण या सर्वच चिह्नांचा विचार इथे करणार आहोत. या चिह्नांची नावे अंशतः दर्शनी आकारावरून दिली आहेत आणि अंशतः त्यांच्या प्रमुख कार्यावरून दिली आहेत. ज्या ठिकाणी प्रचलित नावापेक्षा काही निराळ्या संज्ञा सुचवल्या आहेत त्या ठिकाणी ओळख पटावी एवढ्यापुरती प्रचलित नावे कंसकोष्ठकात दिली आहेत. हस्तलेखनात तारकाचिह्न कधी × भोवती चार टिंबे टाकून लिहितात.

## काही ऐतिहासिक नोंदी

मराठी भाषेसाठी आपण देवनागरी लिपीचा उपयोग करतो खरे. पण तिच्या प्रचलित लेखनव्यवस्थेत आताच दिलेल्या यादीपैकी फक्त दोन विरामचिह्ने (। ॥), दोन संदर्भचिह्ने (‸ ०), तीन्ही भेदकचिह्ने (ऽ ऽ ऽऽ), आणि मांडणीचा एक विशेष (जोडून लिहिणे) एवढीच भारतीय परंपरेतून आलेली आहेत. उरलेली सर्व चिह्ने आणि मांडणीचे विशेष आपण इंग्रजी लेखनमुद्रणाच्या मार्फत पाश्चात्त्यांकडून एकोणिसाव्या शतकात उचललेले आहेत. (एक सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे दंड, दुहेरी दंड, संक्षेपचिह्न, आणि काकपदचिह्न ही बार, डबल बार किंवा पॅरलल मार्क, डिग्री साइन, आणि कॅरट या नावाने इंग्रजी लेखनातही उपस्थित आहेत.) इंग्रजीमधील § ( सेक्शन मार्क ), ¶ ( पॅराग्राफ मार्क ), आणि // ( पॅरलल मार्क ) या संदर्भचिह्नांचा आजकाल मराठीत फारसा प्रयोग होत नाही. मुद्रणामध्ये अधोरेखेची जागा जाड ठसा (बोल्डफेस) घेतो. मराठीत इंग्रजीतल्या इटॅलिक्स् फाँटच्या धरतीवर तिरपा ठसा (स्लँट फेस) आणण्याचा प्रयत्न झाला, पण त्याने फारसे मूळ धरलेले नाही. (दुसरा एक प्रयत्न म्हणजे वडोदरा येथील **अभिरुची** छापणाऱ्या आत्माराम प्रेसने वापरलेली हे **अ र् ला इ न स्पे स**. एकोणिसाव्या शतकात इंग्रजीतल्या कॅपिटल अक्षरांच्या धरतीवर मराठीत **वाढत्या आकाराचा जाड ठसा** उपयोगात आणण्याचा प्रयत्न झाला. पण तोही फसला. ) इंग्रजीतून उसन्या घेतलेल्या चिह्नांचा प्रयोग मात्र सर्वस्वी इंग्रजीच्या प्रमाणेच होतो असे नाही. मराठीमधले काही प्रयोग इंग्रजीपेक्षा वेगळे आहेत. शेवटी एक सांगायचे म्हणजे अपूर्णविरामाचा वाक्याच्या शेवटी, परिगणन करताना, आणि काही सांकेतिक शब्दांच्या आगेमागे जो प्रयोग होतो तो केवळ महानुभावी संप्रदायाच्या पारंपरिक लेखनपद्धतीपुरता (आणि तिच्या अर्वाचीन मुद्रणापुरता) सीमित आहे. त्याचा विचार इथे केलेला नाही.

## विरामचिह्नांकनाची तत्त्वे

कोणत्याही मजकुराचे विरामचिह्नांकन (पंक्चुएशन) करताना आपण कशाकशाचे चिह्नांकन पद्धतशीरपणे नाही तरी निदान ढोबळ मानाने का होई ना करीत

असतो ? आपण पुढीलपैकी एक वा अनेक गोष्टींना चिह्नांकित करीत असतो :

(१) सलग बोलण्याचे (म्हणजे संहितेचे) शब्दांगव्यवस्थेतील विशेष (शब्द-बल, शब्द-सीमक, वाक्य-बल, वाक्य-सुर, आणि वाक्य-सीमक, बोलण्यात येणारे वाचाविक्षेप);

(२) व्याकरणामधले म्हणजे रूपांग व्यवस्थेतील विशेष (पद, पदबंध, आणि वाक्य यांची रचना आणि यांचे कार्य);

(३) व्यक्त होणाऱ्या अर्थाचे अर्थांगव्यवस्थेतील विशेष (कोशगत अर्थ आणि आणि वाक्यरचनेतून निघणारे अर्थ).

म्हणजे भाषेच्या शब्दांग, रूपांग, आणि अर्थांग या तीनही अंगांशी विरामचिह्नांकनाचा संबंध पोचतो असे दिसून येईल. उदाहरण द्यायचे झाले तर विधानवाक्य किंवा आज्ञावाक्य यांच्या शेवटी जो पूर्णविराम येतो तो एकाच वेळी शब्दांग-व्यवस्थेतील अवरोही वाक्य-सुर आणि समापक वाक्य-सीमक दाखवतो, रूपांग-व्यवस्थेतील वाक्य हा व्याकरणिक घटक दाखवतो, आणि अर्थांगव्यवस्थेतील प्रश्न किंवा उद्गार अर्थाचा अभाव दाखवतो. अर्थांगविशेषांची दखल आपण विरामचिह्ने देताना घेतो याचाच अर्थ लिहिणाराला आपल्याला जो अर्थ विवक्षित असेल त्याला धरून त्या ठिकाणी कोणते विरामचिह्न वापरायचें किंवा कोणतेच विरामचिह्ने वापरायचे नाही हे ठरवण्याची मोकळीक राहते. अमूक मजकुरात अमूक ठिकाणी सगळ्यांनी अमूकच विरामचिह्न वापरायचे असें आपण छातीठोकपणे सांगू शकत नाही, आपल्याला हे किंवा ते असा विकल्प मानावा लागतो, आणि अंतिम निवड लिहिणाऱ्याच्या विवक्षेप्रमाणे ठरते. उदाहरणार्थ आज्ञावाक्याच्या शेवटी पूर्णविराम येईल त्याप्रमाणे उद्गारचिह्नही येऊ शकेल.

ही जी तीन मार्गदर्शक तत्त्वे आपण आताच पाहिली ती तपशीलवार लागू करताना काही मर्यादांचे अवधान ठेवावे लागतें :

(१) विरामचिह्ने आणि / किंवा संदर्भचिन्हे यांची ओळीने माळ तयार होऊ देणे आपण शक्यतो टाळतो;

(२) विशिष्ट प्रसंगी (सिचुएशनमध्ये) दुर्बल आणि प्रबल चिह्नांमधून निवड करायची असली तर आपण शक्यतो दुर्बल चिह्नांची निवड करतो – प्रसंगी सर्वात दुर्बल ठरणारा पर्याय म्हणजे विरामचिह्नाचा अभाव, जो बहुधा शब्द तोडून सोडलेल्या जागेच्या रूपाने दिसतो;

(३) मात्र ज्या ठिकाणी स्पष्टता आणायची असेल त्या ठिकाणी प्रबल पर्याय निवडावा लागतो – समजा नवागत किंवा संदिग्ध शब्दयोजना असेल अशा ठिकाणी;

(४) सामान्यत: काही लेखनप्रकारात अतिदुर्बल विरामचिह्नांकन पसंत केले जाते – कायदेशीर दस्तऐवज, काव्य, पुण्य प्रबंध (सेक्रेड डिस्कोर्स), अनौपचारिक संवाद, जाहिरातींच्या जातीचा प्रदर्शनयोग्य मजकूर, सूचींच्या जातीचा संदर्भयोग्य मजकूर (प्रबल विराम-चिह्नांकन मराठीत फारसे पसंत केले जात नाही एवढे मात्र खरे).

## प्रसंगानुसार विरामचिह्नांची निवड

एकएक विरामचिह्न क्रमाने घेऊन ते कोणत्या प्रसंगी कोणते कार्य पार पाडते हे पहात बसण्यापेक्षा एकएक प्रसंग क्रमाने घेऊन त्या ठिकाणी कोणती विरामचिह्ने पर्याय म्हणून वापरायला उपलब्ध असतात आणि ती त्या ठिकाणी कोणती कार्ये पार पाडतात हे पाहणे अधिक उद्बोधक आणि अधिक रोचक होईल या कल्पनेने या ठिकाणी विवेचनाची मांडणी केली आहे. ती मांडणी सूत्रपद्धतीने केली आहे आणि सोयीसाठी सूत्रांना क्रमदर्शक आकडे–अक्षरे (अॅल्फान्यूमेरिक नोटेशन) टाकली आहेत. क, ख असे पर्याय देताना प्रबल पर्यायांकडून दुर्बल पर्यायांकडे असा क्रम ठेवला आहे. जेव्हा सूत्रात सांगितलेल्या अटी पुऱ्या होणार नाहीत तेव्हाचे काय असा प्रश्न वाचकाच्या मनात उभा राहील तेव्हा ‘ एरवी ’ असे म्हणून उत्तर सुचवले आहे. सूत्रानंतर दिलेली उदाहरणे मोठ्याने वाचून पहावीं.

१. वाक्याच्या शेवटी.

१. १. ते सगळे वाक्य किंवा त्या वाक्याचा अंतिम भाग म्हणजे एक प्रश्न असेल तर –

(क) विशेष आग्रह किंवा उत्तेजित भावना सुचवण्यासाठी उद्गारचिह्न वापरावे;

(ख) त्यांच्या अभावी प्रश्नचिह्न वापरावे.

एरवी सूत्र २ किंवा ४.१ लागू पडेल.

तू काय सिगरेट ओढतोस !
काय म्हणालास ! पुन्हा बोल !
केव्हा ? कुठं ? इथं तर नव्हे ?
त्यानं असं विचारलं की तुम्ही कुठं गेला होता ?
“ तुम्ही कुठं गेला होता ?”, त्यानं विचारलं.
तुम्ही मुंबईला केव्हा गेलात आणि तिथून केव्हा परत आलात ?
तुम्ही कुठं आणि केव्हा गेला होता असं त्यानं विचारलं.
त्याला माझं नाव, कसं कुणास ठाऊक, कळलं.

शेवटची तीन उदाहरणं वेगळी पडतात, कारण त्यांमधले प्रश्न म्हणजे सबंध

वाक्ये नाहीत किंवा वाक्याचे अंतिम भाग नाहीत. त्यामुळे त्यांना सूत्र १.१ लागू न पडता 'एरवी'ची सूत्रे लावून पहावी लागतील.

१. २. ते सगळे वाक्य किंवा त्या वाक्याचा अंतिम भाग म्हणजे एक आज्ञा, एक संबोधन, किंवा एक इच्छावचन असेल तर –

(क) विशेष आग्रह किंवा उत्तेजित भावना सुचवण्यासाठी उद्गारचिह्न वापरावे;

(ख) त्यांच्या अभावी पूर्णविराम वापरावा.

एरवी सूत्र २ किंवा ४.१ लागू पडेल.

बसा पाहू इथं !
आग लागो तुझ्या तोंडाला !
आई ग !
पळा पळा !
इथं बसा. हे पत्र वाचा.
त्यानं म्हटलं की इथं बसा, हे पत्र वाचा.
"इथं बसा. हे पत्र वाचा", त्यानं म्हटलं.
आजच्या रात्री त्याला इथंच राहू दे.
आई.
तो "आई" म्हणाला.
इथं बसा असं त्यानं म्हटलं.
तुझं नाव त्याला समजा कळलं तर काही बिघडलं नाही.

१. ३. ते सगळे वाक्य म्हणजे एक उद्गार असेल तर –

(क) संयतता सुचवण्यासाठी पूर्णविराम वापरावा;

(ख) त्याच्या अभावी उद्गारचिह्न वापरावे.

तो म्हणाला, "शाबास."
"वा रे वा !", तो म्हणाला.
वा रे वा ! असं तो म्हणाला.

१. ४. ते सगळे वाक्य किंवा त्या वाक्याचा अंतिम भाग म्हणजे एक विधान असेल तर –

(क) विशेष आग्रह किंवा व्याजोक्ति किंवा तीव्र इच्छा किंवा उत्तेजित भावना सुचवण्यासाठी उद्गारचिह्न वापरावे;

(ख) त्यांच्या अभावी पूर्णविराम वापरावा.

एरवी सूत्र २ किंवा ४.१ लागू पडेल.

काय मूर्खपणा आहे हा !

तो इतक्या सिगारेटी दिवसभर ओढत होता !
छान छान !
शाहणे आहात झालं !
"तू कुठं गेला होतास ?" "मसणात !"
"तू कुठं गेला होतास ?" "सिनेमाला."
म्हणजे तू सिगारेट ओढतोस !
ती आली तर किती बरं होईल !
मुंबईला गेलो होतो. परीक्षेसाठी. लगेच परत आलो.
त्यानं म्हटलं की परीक्षेसाठी.
परीक्षेसाठी म्हणून त्यानं सांगितलं.
काय मूर्खपणा आहे हा असं म्हटल्यावाचून मला राहवत नाही.
त्याचं माझ्याशी – बरेच दिवस झाले त्याला – एक भांडण झालं.

२. वाक्याचा एखाद्या ठिकाणी तात्पुरता शेवट केला असेल आणि नंतर लगेच पुढचे वाक्य किंवा अन्वयदर्शकाने जोडून घेतलेले पुढचे वाक्य आलेले असेल तर –

२. १. जर दोन्ही वाक्ये साधारणतः सारख्या वजनाची असतील (म्हणजे दुसरे वाक्य पहिल्या वाक्याचा विस्तार, विरोधी बाजू मांडणारे, खुलासा, मुरड, गर्भित अनुमान, अनुयोजन, किंवा असेच काही असेल) तर पहिल्या वाक्याच्या शेवटी –

(क) कच्चा अन्वय सुचवण्यासाठी पूर्णविराम वापरावा;
(ख) बरा अन्वय सुचवण्यासाठी अर्धविराम वापरावा;
(ग) काहीसा पक्का अन्वय सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;
(घ) अगदी पक्का अन्वय सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिह्न वापरू नये.

एरवी (पहिल्या वाक्याच्या शेवटी) सूत्र १ लागू पडेल.

टीप : आणि, व, किंवा, म्हणजे ही अन्वयदर्शके दोन वाक्यांच्या मध्ये असली किंवा मध्ये नसली तरी त्याच मालिकेत नंतर यायची असली किंवा दोन वाक्यांना सामायिक घटक असले तर दुवा तुलनेने बळकट ठरतो. ती वाक्ये लांबलचक असली किंवा अगदी सारख्या वजनाची असली किंवा अन्वयदर्शकाने जोडून घेतलेली नसली तर दुवा तुलनेने कच्चा ठरतो.

मी मुंबईला गेलो. सगळ्यांच्या भेटी झाल्या. (सूत्र १ लागते.)
मी मुंबईला गेलो : गंमत म्हणून गेलो नव्हतो.
मी मुंबईला गेलो होतो; कालच परत आलो.
मी मुंबईला स्वतः गेलो; तेव्हा कुठे काम झालं.
प्रथम तो एकटा आला, नंतर त्याची बायको आली, आणि शेवटी त्याची मुलगी आली.

उठा, चला, कामाला लागा.
मी मुंबईला गेलो, तर तो मुंबईहून आणखी कुठं तरी गेला.
तो कुठे राहतो आणि काय करतो ? ('तो' सामायिक.)
या बसा.
पळा पळा.
पळा ! पळा !

२. २. जर पहिल्या वाक्यापेक्षा दुसरे बऱ्याच कमी वजनाचे असेल (म्हणजे दुसरे वाक्य पहिल्या वाक्याला मागाहून जोडलेला तपशील, उत्कंठा वाढवण्यासाठी तात्पुरता राखून ठेवलेला तपशील, पश्चाद्बुद्धी, संबोधन, उद्गार, अभिवादन, अंत्यविस्थापित घटक, किंवा असेच काही असेल) तर पहिल्या वाक्याच्या शेवटी –

(क) अगदी कच्चा अन्वय सुचवण्यासाठी वियोगीचिह्न वापरावे;
(ख) काहीसा कच्चा अन्वय सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;
(ग) पक्का अन्वय सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिह्न वापरू नये (इथे सूत्र १ लागते ते दुसऱ्या वाक्यानंतर).

एरवी (पहिल्या वाक्याच्या शेवटी) सूत्र १ लागू पडते.

मी मुंबईला गेलो होतो. अगदी गळ्याशपथ !
मी मुंबईला गेलो होतो – इथली कामं आटोपल्यावर.
उद्या आपण भेटूच, नमस्कार.
मी मुंबईला गेलो होतो, जिवाची मुंबई करायला !
मॅच् झाली नाही जोराचा पाऊस पडला म्हणून.
मी मुंबईला गेलो होतो म्हटलं बाईसाहेब.
तो कुठं गेला आहे ग मुली ? (वस्तुतः प्रश्नाचा शेवट 'आहे' नंतरच होतो.)
तो महत्त्वाच्या क्षेत्री जाऊन आला – काशी, रामेश्वर, आणि प्रयाग या ठिकाणी.
हिंदूंची तीन महत्त्वाची क्षेत्रे आहेत : काशी, रामेश्वर, आणि प्रयाग. (इथे मात्र सूत्र २.१ (क) लागू पडते.)
दुसऱ्या, चवथ्या, पाचव्या उदाहरणात अंत्यविस्थापन दिसून येत आहे.

२. ३. जर पहिले वाक्य दुसऱ्या वाक्यापेक्षा बऱ्याच कमी वजनाचे असेल (म्हणजे पहिले वाक्य दुसऱ्या वाक्याचा पूर्वकल्पना देणारा गोषवारा, संबोधन, उद्गार, प्रसंगनिर्मिती करणारा तपशील, शीर्षक, आद्यविस्थापित घटक, संवादामधील वक्तासूचक, किंवा असेच काही असेल), तर पहिल्या वाक्याच्या शेवटी –

(क) अगदी कच्चा अन्वय सुचवण्यासाठी अपूर्णविराम वापरावा;
(ख) कच्चा अन्वय सुचवण्यासाठी वियोगीचिह्न वापरावे;

(ग) काहीसा पक्का अन्वय सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;

(घ) अगदी पक्का अन्वय सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिह्न वापरू नये.

एरवी (पहिल्या वाक्याच्या शेवटी) सूत्र १ लागू पडते.

टीप : अशा प्रसंगी अपूर्णविरामाऐवजी अपूर्णविराम आणि जोडीला लगेच वियोगीचिह्न वापरणे हल्ली जुन्या वळणाचे ठरते.

असं कर. हे पुस्तक त्याला आजच नेऊन दे. (सूत्र १ लागते.)

हो तर ! त्यानं सगळं सांगितलं मला.

उंची : १५० सेंटिमीटर, वजन : ४५ किलोग्रॅम.

पूर्वेतिहास : डेकन कॉलेज म्हणजे सुरुवातीला एक संस्कृत पाठशाळा होती. (जुन्या वळणाचे लेखन : पूर्वेतिहास :—)

प्रिय महाशय : पत्र मिळाले, आपण सांगितल्याप्रमाणे करतो.

खरं सांगायचं तर – तो परीक्षेत चक्क नापास झालाय.

कोणे एके काळी, एक राजा होता.

नमस्कार, या बसा.

नाही, मला तसं म्हणायचं नाही.

परीक्षेसाठी मी मुंबईला गेलो होतो. (आद्यविस्थापित: परीक्षेसाठी)

परीक्षेसाठी गेलो होतो मी मुंबईला. (आद्यविस्थापित: परीक्षेसाठी गेलो होतो)

काशी, रामेश्वर, प्रयाग – तो या सगळ्या क्षेत्री जाऊन आला.

काशीबाई : या या, इकडं कुठं ?

सत्यभामाबाई : इकडं सहज दुकानात आले होते. म्हटलं शिरावं जरा तुमच्याकडे.

३. ज्यानंतर त्याच वाक्याचा पुढचा घटक येत आहे अशा वाक्यघटकाच्या शेवटी.

३. १. ते दोन्ही वाक्यघटक त्या वाक्यात भिन्न कार्ये करत आहेत अशा प्रसंगी.

३. १. १. जर ते दोन्ही वाक्यघटक वाक्यरचनेत पुरे गुंतलेले म्हणजे अनुस्यूत असले तर पहिल्या वाक्यघटकानंतर –

(क) काहीसा कमी पक्का अन्वय सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;

(ख) पक्का अन्वय सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिह्न वापरू नये.

टीप : सामान्यत: हे दोन वाक्यघटक म्हणजे कर्ता आणि क्रियापद, कर्म आणि क्रियापद, विधेयविस्तारक आणि क्रियापद, क्रियापूरक आणि क्रियापद, आख्यातेतर धातुविकारित आणि त्याचे सहायक धातुविकारित, मर्यादाकारक गुणवाचक आणि त्याचे विशेष्य, नामपद आणि त्याचे उत्तरयोगी, अवधारित आणि अवधारणासूचक या जोड्या समजाव्या. शेवटच्या दोन जोड्यांमध्ये कोणतेच विरामचिह्न नसले





अनुक्रमणिका

तर सामान्यतः जोडून लिहिण्याची पद्धत तोडून लिहिण्यापेक्षा अधिक प्रचलित आहे.

तो "मी मुंबईला गेलो होतो" असं म्हणाला.

तो म्हणाला, "मी मुंबईला गेलो होतो." (या वाक्यात कर्म अंत्य-विस्थापित म्हणजे उचलून शेवटी टाकलेले.)

"मी मुंबईला गेलो होतो" असं म्हणाला तो. (या वाक्यात कर्म आणि क्रियापद आद्यविस्थापित म्हणजे उचलून सुरुवातीला टाकलेले.)

बाळानं तिचं बोट घट्ट पकडून ठेवलं होतं.

मी तो स्क्रू पिळून घट्ट केला होता.

यंदाचं संमेलन मुंबई शहरी भरणार आहे.

जावं असं तुला वाटतं का ?

त्यानं आपलं काम बिनबोभाट करून टाकलं होतं.

डेकन कॉलेजातील प्राध्यापक डॉक्टर कालेलकर यांना मी भेटले.

डॉक्टर ना. गो. कालेलकर, प्राध्यापक, डेकन कॉलेज यांनी हे पुस्तक लिहिले आहे.

ज्यांच्यावर शिक्के होते ती पुस्तकं मी बाजूला काढली. (मर्यादाकारक गुणवाचक.)

सगळ्यांच्या साठी. (किंवा : सगळ्यांच्यासाठी.)

सगळ्यांसाठी. ('साठी' हे उत्तरयोगी.)

कालेलकर सुद्धा. (किंवा : कालेलकरसुद्धा.) ('सुद्धा' हे अवधारणा-सूचक.)

कालेलकरच. (नको : कालेलकर च.)

त्यांच्याच साठी. (किंवा : त्यांच्याचसाठी.)

त्यांच्या अगोदरच. (किंवा : त्यांच्याअगोदरच.)

३. १. २. जर दोन्ही वाक्यघटकांपैकी एक किंवा दोन्ही वाक्यरचनेंत कमी गुंतलेले म्हणजे आनुषंगिक असले तर पहिल्या वाक्यघटकानंतर –

(क) कमी गुंतणूक सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;

(ख) थोडी कमी गुंतणूक सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिन्ह वापरू नये.

टीप : आनुषंगिक वाक्यघटकांची ठळक उदाहरणे म्हणजे वाक्यविस्तारक (कुठे, केव्हा इत्यादी ते सांगणारे घटक) किंवा वाक्यविशेषण (वस्तुस्थितीबद्दल टिप्पणी करणारे किंवा अगोदर सांगितलेल्या वस्तुस्थितीशी जोडून घेणारे किंवा असलेच घटक).

जर जोराचा पाऊस पडला, तर मॅच् होणार नाही.





अनुक्रमणिका

ऊन पडल्यावर मॅच् पुन्हा सुरू होईल.
जोराचा पाऊस पडला म्हणून मॅच् रद्द करावी लागली.
गंमत म्हणून मी त्याला ही गोष्ट सांगितली.
साहजिकच, तो आला नाही.
तो साहजिकच आला नाही.
तो आडदांड माणूस, शांतपणे सिगारेटचे झुरके घेत, सगळी मजा बघत होता.
तो नक्कीच उद्या मुंबईहून येईल. ('नक्कीच' हे वाक्यविशेषण)
नक्कीच तो उद्या मुंबईहून येईल.
सारासार विचार करता, आपण जायची घाई करू नये.

३. २. ते दोन्ही वाक्यघटक त्या वाक्यात अभिन्न कार्ये करत आहेत अशा प्रसंगी.

३. २. १. जर ते दोन्ही वाक्यघटक चढत्या किंवा उतरत्या भाजणीत गुंतलेले असले, तर पहिल्या वाक्यघटकानंतर –

(क) कच्चा अन्वय सुचवण्यासाठी अपूर्णविराम वापरावा;
(ख) काहीसा पक्का अन्वय सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;
(ग) अगदी पक्का अन्वय सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिह्न वापरू नये.

टीप : सामान्यत:, दोन किंवा अधिक घटकांची ही मालिका म्हणजे विशेष्याशी अधिकाधिक निगडित गुणवाचकांची असते किंवा अधिकाधिक समावेशक वा अल्पसमावेशक स्थल, काल, अभिधान यांची असते. पर्याय (क) साठी अपूर्ण-विरामाच्या जागी पूर्णविराम, संयोगीचिह्न, वियोगीचिह्न, विकल्पचिह्न, किंवा दंड देखील येऊ शकतो.

ऋग्वेद : मंडल २ : सूक्त १ : ऋचा ३. (किंवा : ऋग्वेद २ : १ : ३. किंवा : २. १. ३. किंवा : २–१–३. किंवा : २।१।३.)
नियम ३ क. नियम ३. १. २.
१२।४ नारायण पेठ, पुणे ४११०३०, महाराष्ट्र राज्य, भारत. ('नारायण पेठ'च्या आधीचा आणि 'पुणे'च्या नंतरचा विरामचिह्नांचा अभाव लक्षात घ्यावा. १२।४ ऐवजी १२/४ लिहिता येईल.)
३ रुपये, ४ आणे, ६ पै.
रविवार तारीख बावीस जानेवारी १९८९ रोजी. (किंवा : रविवार तारीख २२. ०१. १९८९ रोजी.)
गतवर्षी जानेवारीत पुण्याला माझ्या घरी आम्ही सगळेजण जमलो होतो.
नारायण गोविंद कालेलकर. (या ठिकाणी मधले नाव अमक्याचा पुत्र या अर्थी म्हणून अधिक समावेशक आहे.)

महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणे.

एक उंच वठलेले कडूनिंबाचे झाड.

३. २. २. जर ते दोन्ही वाक्यघटक परिगणनवाचक रचनेत गुंतलेले आणि परस्परता, एकत्रता, वा तुल्ययोगिता सुचवणारे असतील, तर पहिल्या वाक्य-घटकानंतर —

(क) कच्चा अन्वय सुचवण्यासाठी अर्धविराम वापरावा;

(ख) काहीसा पक्का अन्वय सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;

(ग) अगदी पक्का अन्वय सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिह्न वापरू नये.

टीप : आणि, व, किंवा ही अन्वयदर्शके दोन वाक्यघटकांच्या मध्ये असली (मात्र तीन किंवा अधिक घटकांची मालिका आणि ही अन्वयदर्शके केवळ शेवटच्या दोन घटकांच्या दरम्यान अशी स्थिती नसली) तर दुवा तुलनेने बळकट ठरतो. ही सगळी मालिका म्हणजे उत्तरयोगीचे एक नामपद असते आणि अन्वयदर्शके नसतात अशा प्रसंगी दुवा अगदी बळकट समजला जातो आणि मालिका जोडून लिहिली जाते.

नवरा, बायको, आणि मुलगा यांनी एकमेकांना भेटी दिल्या.

(पण : नवरा आणि बायको यांनी एकमेकांना भेटी दिल्या. परस्परतायुक्त परिगणन.)

नवरा, बायको, आणि मुलगा यांनी मिळून प्रवास केला.

(एकत्रतायुक्त परिगणन.)

नवरा, बायको, आणि मुलगा यांनी बुद्धिबळात प्रावीण्य मिळवले.

(तुल्ययोगितायुक्त परिगणन.)

शांत, निगर्वी, पण महत्त्वाकांक्षी मुलगी.

तीनचार तास.

पोटाचा आणि पाठीचा त्रास.

पोटाच्या आणि पाठीच्या जवळ.

पोटापाण्याचा प्रश्न.

नाकातोंडात पाणी गेले.

नाकात आणि तोंडात पाणी गेले.

चहा, कॉफी, कोको.

चहा आणि कॉफी आणि कोको.

चहा, कॉफी, किंवा कोको.

चहा, कॉफी, व इतर पेये.

चहा, कॉफी वगैरे.

चहा आणि कॉफी तयार केल्यावर.
चहाकॉफी प्यायल्यावर.
फूल नाही तर फुलाची पाकळी स्वीकारावी.
काळीसावळी पण स्मार्ट मुलगी.
काशी, रामेश्वर, प्रयाग – तो या सर्व क्षेत्री जाऊन आला.
एकमेकावर अविश्वास; धाडसाचा अभाव; आणि स्वतःबद्दल भलत्या कल्पना अशी अपयशाची तीन कारणे झाली.

४. अन्वयामध्ये विक्षेप आलेला आहे अशा प्रसंगीं विक्षेपाच्या आधीच्या भागाच्या शेवटी.

४. १. जर हा विक्षेप मध्येच घुसवलेल्या निवेशित घटकामुळे आलेला असेल तर निवेशित घटकाच्या आगेमागे –

(क) अगदी स्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी उघडते–मिटते चौकोनीकोष्ठक वापरावे;
(ख) काहीसा स्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी उघडते–मिटते कंसकोष्ठक वापरावे;
(ग) अगदी स्पष्ट नसणारा तुटकपणा सुचवण्यासाठी वियोगीचिह्न वापरावे;
(घ) अस्पष्टसा तुटकपणा सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;
(ङ) तसे काही नसता कोणतेच विरामचिह्न वापरू नये.

टीप : सामान्यतः, हा निवेशित घटक म्हणजे अवतरणाबाहेरचा मजकूर, अन्य कुणी लिहिलेली टिप्पणी, उगमाचा निर्देश, प्रतिनिर्देश, संख्येचा पर्यायी निर्देश, स्वगत वा जनांतिक मजकूर, मध्यविस्थापित वाक्यघटक, किंवा वर्णाकरूपी शीर्षक असेल. आद्यनिवेशन किंवा अंत्यनिवेशन असता एकच वियोगीचिन्ह किंवा एकच स्वल्पविराम पुरेसा आहे.

वक्ते म्हणाले, "घराला लागलेली आग भयग्रस्त [यथामूल] होती."
परिषदेकडून रुपये पन्नास पैसे दहा (रुपये ५०.१०) मिळाले ते पावले.
फुलाच्या मध्यभागी एक स्त्रीकेसर (आकृती ५ पहा) असतो.
"बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें." (तुकाराम)
(किंवा : "बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें." – तुकाराम.)
शिवाजीमहाराज १६३० मध्ये (?) जन्मले.
त्यानं राजरोस (काय सांगू ?) एक बाई ठेवली.
तिचं लग्न त्या मुलाशी ठरून – आमच्याच ऑफिसात असतो तो – पुष्कळ दिवस झाले.
तिनं ते लग्न, अगदी लग्नाचा दिवस ठरल्यावर, मोडलं.

" मी मुंबईहून परतलो त्याला ", तो म्हणाला, " खूप दिवस झाले. "

अपयशाची तीन कारणे झाली : (क) एकमेकांवर अविश्वास; (ख) धाडसाचा अभाव; आणि (ग) स्वत:बद्दल भलत्या कल्पना.

तुझं नाव त्याला समजा कळलं तर काही बिघडलं नाही. (कधीकधी : त्याला, समजा, कळलं.)

४. २. जर हा विक्षेप संज्ञापनाच्या ओघात आलेला व्यत्यय किंवा अडथळा (उदाहरणार्थ भाषणक्रिया थांबणे, आशंका, विवक्षापरिवर्तन, मूळ प्रतीमध्ये दुर्वाच्यता इत्यादी कारणांमुळे प्रतिलेखनात पडलेला खंड), साभिप्राय विराम, अवतरण देताना हेतुपूर्वक मुळातला काही भाग गाळणे यांमुळे आलेला असेल (मग संज्ञापन पुन्हा चालू झाले असो वा नसो) तर विक्षेपाच्या आधीच्या भागाच्या शेवटी –

(क) अगदी स्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी खंडविराम वापरावा;

(ख) स्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी वियोगीचिह्न वापरावे;

(ग) कमी स्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी संयोगीचिह्न वापरावे;

(घ) अस्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा.

तो म्हणाला, " मी मुंब..." एवढ्यात मोठा आवाज झाला.

" कोणते पेय आवडेल तुम्हाला ?", तो म्हणाला, " चहा, कॉफी, कोको..." (पूर्ण न केलेले परिगणन)

राम गणेश गडकरी 'कवींचा कारखाना' या लेखात म्हणतात, " आजकाल कवितेच्या कारभारांत पडलेल्या लोकांचे... दोन स्पष्ट विभाग पडलेले आहेत.... 'नव्याचे सोयरे' व ... 'जुन्याचे सुतकी'..." (मुळामध्ये : " आजकाल कवितेच्या कारभारांत पडलेल्या लोकांचे मतभेदानुरूप दोन स्पष्ट विभाग पडलेले आहेत. यांपैकीं एका वर्गाला 'नव्याचे सोयरे' व दुसऱ्या वर्गाला 'जुन्याचे सुतकी' अशीं नांवें देता येतील. " आहेत शब्दानंतर पूर्णविराम, नंतर खंडविराम.)

तो सगळ्यांना सांगत सुटला की – पण जाऊ दे, आता तो विषय कशाला काढायचा ?

तो धावत धावत येऊन सांगू लागला, " मला भ–भ–भूत दिसलं !"

तो शब्द आहे ए–क–स–म–या–व–च्छे–दे–क–रू–न.

तो सगळ्यांना, अगदी सगळ्यांना सांगत सुटला.

४. ३. जर हा विक्षेप संदर्भावरून अध्याहार करता येईल असे वाक्यघटक गाळल्यामुळे आलेला असेल किंवा वाक्यघटकांच्या फेरमांडणीमुळे (उदाहरणार्थ अकारविल्हे करण्यासाठी) आलेला असेल, तर विक्षेपाच्या आधीच्या भागाच्या शेवटी –

(क) काहीसा स्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी स्वल्पविराम वापरावा;

(ख) अस्पष्ट तुटकपणा सुचवण्यासाठी कोणतेच विरामचिह्न वापरू नये.

टीप : फेरमांडणीमध्ये नंतर टाकलेला घटक स्वल्पविरामाने वेगळा दाखवण्याऐवजी विकल्पाने कंसकोष्ठकात घालता येईल.

त्याने रशियात बरीच वर्षे वास्तव्य केले होते, तर त्याच्या बायकोने, फक्त काही महिने. (लोप पावलेल्या शब्दांचा अध्याहार करून : त्याच्या बायकोने रशियात फक्त काही महिने वास्तव्य केले होते.)

तो सध्या रशियात आहे तर ती अमेरिकेत.

कालेलकर, नारायण गोविंद. (किंवा : कालेलकर नारायण गोविंद. किंवा : कालेलकर (नारायण गोविंद).)

भाषाविज्ञान, ऐतिहासिक. (किंवा : भाषाविज्ञान (ऐतिहासिक).)

लोप पावलेले घटक ताडून अर्थ लावणे याला त्यांचा अध्याहार करणे म्हणतात.

४. ४. पालुपद किंवा टिप्पणीसाठी काढलेले प्रतीक यांचा संक्षेप करण्यासाठी फक्त सुरुवातीचे शब्द शिल्लक ठेवायचे आहेत अशा प्रसंगी 'इत्यादी' शब्दाऐवजी संक्षेपचिन्ह वापरता येईल.

दहीभाताची उंडी । लावीन तुझे तोंडीं ।
जीवा पढिये तयाची गोडी । सांग वेगीं ॥ पैल तो गे० ॥

पैल तो गे० – याला लोकांमधल्या समजुतीचा आधार आहे.

५. पदघटक किंवा पदखंड यांच्या शेवटी.

५. १. नियमतः, विक्षेप नसलेले पद सलगपणे पाठोपाठची लिखित अक्षरे जोडून लिहावे.

टीप : देवनागरी लिपीत लिखित अक्षर म्हणजे स्वर असेल (जोडीला त्याच्या अगोदर एक वा अनेक व्यंजने असतील–नसतील आणि त्याला जोडून अनुस्वारासारखा स्वरयोगी वर्ण असेल–नसेल) किंवा एक वा अनेक व्यंजने असतील (मात्र शेवटच्या व्यंजनासोबत विराम किंवा पायमोड पाहिजे). लिखित अक्षर आणि भाषित अक्षर ही सारखीच असतील असे नाही.

दु:ख.

दुष्ट.

आर्द्रा नक्षत्र.

लठ्ठपणा.

मॅच्.

प्स् प्स् ! (मांजराला बोलावण्यासाठी)

५. २. पाठोपाठच्या दोन पदघटकांच्या दरम्यान किंवा दोन अंकघटकांच्या





अनुक्रमणिका

दरम्यान–

(क) अगदी कच्चा अन्वय सुचवण्यासाठी शब्द तोडून लिहावा;

(ख) काहीसा कच्चा अन्वय सुचवण्यासाठी संयोगीचिह्न वापरावे;

(ग) पक्का अन्वय सुचवण्यासाठी जोडून लिहावे आणि प्रसंगी जोडलेले अक्षर लिहावे.

टीप : अंकघटकाच्या दरम्यान शब्द तोडून लिहिण्याऐवजी स्वल्पविराम लिहिता येईल, पण संयोगीचिह्न कधीच लिहिता येणार नाही.

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्. (किंवा : महाराष्ट्र साहित्य परिषद्.)

पूरग्रस्त. (किंवा : पूर-ग्रस्त.)

भूकंप.

महत्त्व. ( या ठिकाणी महत्, त्व हे पदघटक आहेत. )

एकोणीस हजार तीनशे चोवीस. ( या ठिकाणी एकोण, ईस, हजार, तीन, शे, चो, वीस हे पदघटक आहेत. )

१९ ३२४ (किंवा : १९, ३२४. किंवा १९३२४)

३००३. (पाचापेक्षा कमी आकडे असलेल्या संख्या सहसा तोडून लिहीत नाहीत.)

४०, ३३, ०१, ००३. किंवा : ४० ३३ ०१ ००३.)

दूरध्वनि–क्रमांक ३ ३० १० ०३ (किंवा : ३३०१००३.)

३३⅓. ( नको : ३३ – ⅓ )

५. ३. पदखंड सुटे पडतात अशा प्रसंगी.

५. ३. १. पदापासून हेतुपूर्वक वेगळा केलेल्या पदघटकाच्या आगेमागे योग्य तिथे संयोगीचिह्न जोडावे.

पूर- नंतर पाहिजे किंवा भूकंप-ग्रस्त. ( अध्याहार करून : पूर-ग्रस्त किंवा भूकंप-ग्रस्त. )

महत्त्व शब्दात - त्व हा प्रत्यय आहे.

पाठोपाठ शब्दात -ओ- हा मध्य-प्रत्यय आहे.

५. ३. २. जेव्हा पदाचा जागा नसल्यामुळे उरलेला खंड पुढच्या ओळीच्या सुरुवातीला येतो तेव्हा आधीच्या ओळीच्या शेवटी संयोगीचिह्न जोडावे.

टीप : लेखन सुबक वाटावे या दृष्टीने ओळीच्या शेवटी पुढील गोष्टी टाळाव्या : अतिशय तोकडा पदखंड, खुलते अवतरणचिह्न किंवा कंसकोष्ठक किवा महिरपी-कोष्ठक किवा चौकोनीकोष्ठक, त्याचप्रमाणे ओळीच्या सुरुवातीला पुढील गोष्टी टाळाव्या : अतिशय तोकडा पदखंड, मिटते अवतरणचिन्ह किंवा कंसकोष्ठक किंवा महिरपीकोष्ठक किवा चौकोनीकोष्ठक, कोणतेही विरामचिह्न ( मात्र संयोगी-चिह्न, खुलते अवतरणचिह्न किंवा कंसकोष्ठक किंवा महिरपीकोष्ठक किंवा

चौकोनीकोष्ठक यायला काहीच हरकत नाही ), संक्षेपचिन्ह, लोपचिन्ह, द्विखंड, किंवा दुहेरी द्विखंड.

महा- ( नको : म-
राष्ट्र. हाराष्ट्र. )

पूर-
-ग्रस्त.

५. ३. ३. जेव्हा पदखंड किंवा चिह्न किंवा पद किंवा पदे ओळीतून चुकून गळतील तेव्हा दुरुस्तीखातर ओळीच्या वरच्या बाजूला ( किंवा समासात त्याच ओळीला ) लिहिलेला गळलेला भाग कुठे घालायचा हे काकदपदचिह्नाने दाखवावे.

म^हा राष्ट्र.

पूर ^– ग्रस्त.

नारायण ^गोविंद कालेलकर.

५. ३. ४. जर एखादे पदखंड मुद्दाम गाळले असेल आणि त्याच्याकडे लक्ष वेधायचे असेल तर ज्या ठिकाणी ते गाळलें असेल त्या ठिकाणी लोपचिह्न वापरावे. ( मराठी लेखनात या चिह्नाचा प्रयोग फारसा प्रचलित नाही.)

'८३ साल. ( किंवा : १९८३ साल. किंवा : ८३ साल.)

'नगर. (किंवा : अहमदनगर. किंवा : नगर.)

५. ३. ५. जर अश्लील गोष्टी किंवा खाजगी बाब यांच्याकडून लक्ष विचलित करायचे असेल तर संबंधित पद किंवा पदखंड यांच्या जागी एक ते तीन तारकाचिह्ने किंवा वियोगीचिह्न वापरावे.

एका गां*चे गाऱ्हाणे. ( किंवा : एका गां–चे गाऱ्हाणे. अध्याहार करून : एका गांडूचे गाऱ्हाणे. आगेमागे जोडून लिहावे. )

तुझ्या *** ***!

केशवसुतांनी '–प्रत' नावाची एक कविता लिहिली आहे.

५. ३. ६. जर एखादया पदाचे लेखन संक्षेपाने केले आहे याच्याकडे लक्ष वेधायचे असेल तर पदाच्या अंतिम पदखंडाच्या जागी संक्षेपचिन्ह किंवा पूर्णविराम वापरावा.

डॉ० ना० गो० कालेलकर. ( किंवा : डॉ. ना. गो. कालेलकर. अध्याहार करून : डॉक्टर नारायण गोविंद कालेलकर. )

वि० सू० ( किंवा : वि. सू. अध्याहार करून : विशेष सूचना. )





अनुक्रमणिका

त्याची फ झाली. (बोलभाषेत वापर. अध्याहार करून : त्याची फजिती झाली.)

पुरु० शिव० रेगे. (किंवा : पु० शि० रेगे. अध्याहार करून : पुरुषोत्तम शिवराम रेगे.)

अशा प्रसंगी संक्षेपचिह्न पुष्कळदा इंग्रजी पद्धतीने ओळीत उचलून लिहितात आणि मग ते अंशाच्या म्हणजे डिग्रीच्या चिह्नासारखे दिसते.

६. जेव्हा शब्दांनी दाखवायचे अर्थ स्थलसंकोचास्तव किंवा पारिभाषिकता सुचवण्यासाठी खुणांनी दाखवायचे असतात तेव्हा.

६. १. दोन निर्देशित बिन्दूंच्या दरम्यानचा टप्पा दाखवायचा असेल तर संयोगीचिह्न ( किंवा वियोगीचिह्न ) वापरावे.

या वस्तूला ३००–३५० रुपये पडतील. ( अध्याहार करून : तीनशे ते तीनशे पन्नास रुपये. )

वेतनश्रेणी : रुपये ८००–१०००–१४००.

विष्णुशास्त्री चिपळूणकर ( १८५०–१८८२ ). ( किंवा : (१८५०-८२). अध्याहार करून : १८५० ते १८८२ जगले. )

कलम ३ क – ३ ग. ( किंवा : ३ क – ग. अध्याहार करून : कलम ३ क, कलम ३ ख, कलम ३ ग.)

६. २. पर्याय जोडण्यासाठी विकल्पचिह्न वापरावे.

कलम ३क/३ग. (अध्याहार करून : कलम ३ क किंवा कलम ३ ग.)

या वस्तूला ३/४ रुपये पडतील. (अध्याहार करून : तीन किंवा चार रुपये.)

स्त्रिया आणि/किंवा पुरुष (अध्याहार करून : स्त्रिया किंवा पुरुष किंवा स्त्री-पुरुष.)

६. ३. पूर्णांक आणि दशांश अपूर्णांक हे संख्याघटक वेगळे करण्यासाठी पूर्णविराम वापरावा. ( पूर्णविरामाचा असा प्रयोग करताना त्याला पुष्कळदा दशांशचिह्न म्हणतात.)

रुपये ३०.००, ३०.०४, ०.२३. ( अनुक्रमे अध्याहार करून : रुपये ३०, रुपये ३० पैसे ४, पैसे २३. )

६. ४. गुणोत्तर दर्शविण्यासाठी अपूर्णविराम किंवा विकल्पचिह्न आणि प्रमाण दर्शविण्यासाठी दुहेरी अपूर्णविराम वापरावा.

गाय : बैल : : शेळी : बोकड.

या निबंधाचा विषय भाषा : समाज : संस्कृती असा आहे.

वेगमर्यादा : ३० किलोमीटर / तास. ( अध्याहार करून : वेगमर्यादा : दर तासाला ३० किलोमीटर. )

६.५. शंका किंवा अज्ञान दर्शविण्यासाठी प्रश्नचिह्न वापरावे आणि आश्चर्य किंवा

करमणूक किंवा उपहास किंवा कौतुक दर्शविण्यासाठी सुटे उद्गारचिह्न वापरावे.

७. जेव्हा संदेशाच्या विशिष्ट भागाकडे कोणत्या तरी कारणासाठी विशेष लक्ष वेधायचे असेल तेव्हा प्रसंगपरत्वे अवतरणचिह्ने, अधोरेखा, किंवा दुहेरी दंड, यांचा प्रयोग करावा. ज्यावेळी प्रश्नचिह्न, उद्‌गारचिह्न, दंड, अवतरणचिह्न, किंवा अधोरेखा यांच्याकडे विशेष लक्ष वेधायचे असेल तेव्हा त्याचे दुहेरी लेखन करावे.

टीप : मुद्रणामध्ये अधोरेखेऐवजी पुष्कळदा जाड ठसा (बोल्ड फेस) वापरतात.

कवि 'केशवसुत' (कृष्णाजी केशव दामले). (हे कवीचे कविनाम आहे.)

पोरगी एकदम 'कंडा' होती. (ही ग्राम्य म्हणजे स्लँग शब्दयोजना आहे.)

त्याची 'फ' झाली. (हा फजिती शब्दाचा बोलभाषेतील संक्षेप आहे.)

मला 'त्या' मुलाचं नाव सांग. (हा निर्देश निदान बोलणारा–ऐकणारा यांच्यामध्ये तरी निश्चित आहे.)

तो म्हणाला की मी 'मुंबापुरीला' जाऊन आलो. (नेमकी हीच शब्दयोजना त्याने केली याची हमी इथं दिली आहे.)

तो म्हणाला, "मी मुंबापुरीला जाऊन आलो."

तो 'सतारीचे बोल' ही कविता वाचत होता. (किंवा : तो 'सतारीचे बोल' वाचत होता. हे कवितेचे शीर्षक आहे.) त्याने 'सतारीचे बोल' वाचलो.

भारतातही 'ग्लासनोस्त'ची गरज आहे का? (हा परभाषेतला शब्द आहे.)

मला त्याच्याबद्दल आदर आहे, कारण तो बोले तैसा चाले. (या ठिकाणी तुकारामाच्या अवतरणाकडे विशेष लक्ष वेधलेले नाही, तुकारामाची शब्दयोजना एक वाक्प्रचार बनलेली आहे.)

।। श्री गजानन प्रसन्न ।। (हिन्दू दैवताला इथे मंगलार्थ आवाहन केलेले आहे.)

।। श्री ।।

मी <u>ठाण्याला</u> गेलो होतो. (या ठिकाणी इतर स्थळे वगळायची असे सुचवले आहे.)

त्याच्या अंगाचा <u>भडका</u> उडाला ! (या ठिकाणी भडक्याची तीव्रता सुचवली आहे.)

त्याची जिरली ! अगदी फटफजिती झाली !!

तुला खरं वाटतं तो सांगतो ते ??

नाही ! <u>नाही</u> !! <u>नाही</u> !!! (वाढते बलमान आणि स्वरमान.)

८. पद्याच्या घटकाच्या शेवटी.

८. १. जर हा पद्याचा घटक म्हणजे छंदोबद्ध ओळ किंवा कडवे, पंक्ती किंवा





अनुक्रमणिका

श्लोक यांपैकी असला तर त्याच्या शेवटी दंड किंवा दुहेरी दंड वापरावा.

टीप : जर ओळीखाली ओळ अशी मांडणी असली तर विकल्पाने दंड गाळावा.

बोले तैंसा चाले । त्याचीं वंदावीं पाऊलें ।।

किंवा :

बोले तैंसा चाले ।
त्याचीं वंदावीं पाऊलें ।।

किंवा :

बोले तैंसा चाले
त्याचीं वंदावीं पाऊलें

८. २. जर हा पद्याचा घटक म्हणजे मुक्तच्छंदी ओळ किंवा पद्यपरिच्छेद यांपैकी असला तर त्याच्या शेवटी दंड किंवा दुहेरी दंड वापरावा, मात्र जर ओळीपुढे ओळ अशी मांडणी असली तर.

टीप : जर ओळीखाली ओळ अशी मांडणी असली तर दंड वापरू नये.

खिडकीबाहेर । ढाळिता चवरी ।। आसुसलेला । शेवगा दारचा. ।।

किंवा :

खिडकीबाहेर ढाळिता चवरी
आसुसलेला शेवगा दारचा.

– पु. शि. रेगे

## विरामचिह्नांचे समायोजन

९. जेव्हा एकापाठोपाठ एक विरामचिह्ने किंवा सदर्भचिह्ने यायची असतात तेव्हा काही समायोजन (अड्जस्ट्मेंट) करावे लागते.

९. १. जेव्हा एखादे विरामचिह्न आणि तारकाचिह्न, क्रूसचिह्न, दुहेरी क्रूसचिह्न, किंवा समकार्य वर्णांकचिह्न (की जी प्रतिसंदर्भ देत आहेत) एका ठिकाणी यायची असतात तेव्हा विरामचिह्न नेहमी अगोदर यावे.

बोले तैंसा चाले । त्याचीं वंदावीं पाऊलें ।। *

अन्यत्र :

* तुकाराम

(तारकाचिह्नाऐवजी, उदाहरणार्थ, २ किंवा २ क देखील येऊ शकेल. टिपेच्या सुरुवातीला जें तारकाचिह्न वगैरे येईल त्याला अर्थात् हे सूत्र लागू नाही. त्या ठिकाणी संदर्भचिह्नच अगोदर येणार हे उघड आहे.)

९. २. विरामचिह्नांकनाचे संधी होतात, आणि काही प्रसंगी पूर्णविराम किंवा स्वल्पविराम गाळावे लागतात :

(क) पूर्णविराम वा प्रश्नचिह्न वा उद्गारचिह्न आणि पाठोपाठ मिटते अवतरणचिह्न आणि पाठोपाठ पूर्णविराम अशी स्थिती जिथे असेल तिथे नंतरचा पूर्णविराम गाळावा.

(ख) पूर्णविराम आणि पाठोपाठ मिटते अवतरणचिह्न वा मिटता कोष्ठक आणि पाठोपाठ अवतरणचिह्न वा कोष्ठक यांनी खंडित झालेले वाक्य पुढे चालू राहणे किंवा पूर्ण होणे अशी स्थिती जिथे असेल तिथे अगोदरचा पूर्णविराम गाळावा.

(ग) स्वल्पविराम वा अर्धविराम आणि पाठोपाठ मिटते अवतरणचिह्न आणि पाठोपाठ स्वल्पविराम अशी स्थिती जिथे असेल तिथे नंतरचा स्वल्पविराम गाळावा.

टीप : गाळायचा पूर्णविराम हा वाक्याच्या शेवटचा (सूत्र १ ला धरून आलेला) असावा. संक्षेपचिह्नाऐवजी येणाऱ्या पूर्णविरामाला किंवा दशांशचिह्नाला हे सूत्र लागू नाही. या प्रसंगी गाळायचा स्वल्पविराम हा विक्षेप आणणाऱ्या निवेशित घटकाच्या सुरवातीचा (सूत्र ४.१ (घ) ला धरून आलेला) स्वल्पविरामच असला तरच सूत्र ९.२ (ग) मध्ये वर्णिलेली स्थिती उत्पन्न होईल हे थोड्या विचारांती समजावे.

त्यानं विचारलं, "तू कुठं गेला होतास ?" (संधी व्हायच्या आधी : त्यानं विचारलं, "तू कुठं गेला होतास ?".)

काय मीच तोंडाने सांगू की "मी मुका आहे" ? (संधी व्हायच्या आधी : काय मीच तोंडाने सांगू की "मी मुका आहे." ?)

कठीण आहे, त्यानं तोंडानं सांगितलं की "मी मुका आहे" ! (संधी व्हायच्या आधी : कठीण आहे, त्यानं तोंडानं सांगितलं की "मी मुका आहे." !)

"मी मुका आहे" असं त्यानं पाटीवर लिहून दाखवलं. (संधी व्हायच्या आधी : "मी मुका आहे." असं त्यानं पाटीवर लिहून दाखवलं.)

फुलाच्या मध्यभागी एक स्त्रीकेसर (आकृती ५ पहा) असतो. (संधी व्हायच्या आधी : फुलाच्या मध्यभागी एक स्त्रीकेसर (आकृती ५ पहा.) असतो.)

फुलाच्या मध्यभागी एक स्त्रीकेसर असतो (आकृती ५ पहा).

"मी मुंबईहून आज परत आलो;" तो म्हणाला, "उद्या परत जाईन." (संधी व्हायच्या आधी : "मी मुंबईहून आज परत आलो;", तो म्हणाला, "उद्या परत जाईन.")

दूरध्वनीच्या शोधामुळे दळणवळणात क्रांती झाली. (हा शोध बेल्‌ने १८७६ साली लावला.) एका प्रदेशातली घटना लगेच दूरच्या प्रदेशातही कळू लागली. (सूत्र लागू पडत नाही.)

त्यानं मला विचारलं, "तुम्ही कोण ?" ! (सूत्र लागू पडत नाही.)

सूत्र ४.१ टीप मधले शेवटचे वाक्य म्हणजे देखील विरामचिह्नांच्या संधी-विषयीच आहे असे म्हणता येईल.

१०. जेव्हा वाक्याच्या पोटात वाक्याचा समावेश किंवा वाक्यघटकाच्या पोटात वाक्यघटकाचा समावेश अशी स्थिती असेल तेव्हा विरामचिह्नांच्या श्रेणी ठरवाव्या लागतात.

१०. १. जेव्हा निवेशित घटकाच्या पोटात दुसऱ्या घटकाचा निवेश अशी स्थिती असेल तेव्हा.

१०. १. १. चौकोनीकोष्ठकाच्या आत महिरपीकोष्ठक आणि महिरपीकोष्ठ-काच्या आत कंसकोष्ठक अशी व्यवस्था लावावी. मात्र महिरपीकोष्ठकाचा प्रयोग सहसा होत नाही आणि अर्थाची स्पष्टता कायम रहात असेल तर कंसकोष्ठकाच्या आत कंसकोष्ठक ठेवायला हरकत नाही.

[पहा : सकाळ (पुणे) १७ जून १९८९.]

किंवा :

(पहा : सकाळ (पुणे) १७ जून १९८९.)

१०. १. २. वियोगीचिह्नाने बंदिस्त निवेशित घटकाच्या पोटात स्वल्पविरामाने बंदिस्त निवेशित घटक अशी व्यवस्था लावावी.

तिने ते लग्न – अगदी लग्नाचा दिवस, मला वाटतं २५ मेचा, हा ठरल्यावर – मोडलं.

१०. २. जेव्हा अवतरणचिह्नांनी बंदिस्त मजकुराच्या पोटात अवतरणचिह्नांनी बंदिस्त मजकूर अशी स्थिती असेल तेव्हा एकेरी आणि दुहेरी अवतरणचिह्ने आलटूनपालटून वापरावी.

त्याने केशवसुतांची '"पण लक्ष्यात कोण घेतो ?" च्या कर्त्यास' ही कविता वाचली.

घर या पदार्थाला 'घर' हे पद नाव म्हणून वापरले जाते आणि 'घर' या पदाला "'घर'" हे नाव म्हणून वापरता येईल. (किंवा : घर या पदार्थाला "घर" हे पद नाव म्हणून वापरले जाते आणि "घर" या पदाला '"घर"' हे नाव म्हणून वापरता येईल.)

१०. ३. जेव्हा वाक्यघटकाच्या पोटात वाक्यघटकाचा समावेश होतो तेव्हा पूर्णविरामांकित खंडाच्या पोटात अर्धविरामांकित खंड आणि अर्धविरामांकित खंडाच्या पोटात स्वल्पविरामांकित खंड अशी व्यवस्था लावावी.

अत्रे, प्रल्हाद केशव; घाटे, विठ्ठल दत्तात्रय (संपादक). नवयुग वाचन माला.

चहा, कॉफी, किंवा थंड पेय; वडा, समोसा, किंवा केक असा बेत ठेवू. (या

ठिकाणी अर्धविरामाच्या जागी केवळ आणि घालता येईल, मग दुसऱ्या विरामचिह्नाची गरज नाही.)

१०. ४. जेव्हा पदघटकाच्या पोटात पदघटकाचा समावेश होतो तेव्हा शब्द तोडून पाडलेल्या खंडाच्या पोटात संयोगीचिह्नांकित खंड आणि संयोगीचिह्नांकित खंडाच्या पोटात जोडून घेतलेले खंड अशी व्यवस्था लावावी.

महाराष्ट्र-राज्य पाठ्यपुस्तक-निर्मिती व अभ्यासक्रम-संशोधन मंडळ, पुणे,

काळकामवेगाच्या गणितात काळ, काम, वेग यांचा विचार करावा लागतो.

या सूत्राची तुलना सूत्र ३. १. १, टीप, उत्तरार्ध याच्याशी करून पाहता येईल.

१०. ५. जेव्हा पद्यघटकाच्या पोटात पद्यघटकाचा समावेश होतो तेव्हा दुहेरी दंडाने दर्शविलेल्या घटकाच्या पोटात एकेरी दंडाने दर्शविलेला घटक अशी व्यवस्था लावावी.

खिडकीबाहेर । ढाळिता चवरी ।। आसुसलेला । शेवगा दारचा. ।।

## मांडणीचे विशेष

विरामचिह्नांकनाच्या जोडीने जोडून लिहिणे आणि तोडून लिहिणे या मांडणीच्या विशेषांचा विचार पूर्वीच येऊन गेला आहे.

मराठी भाषा देवनागरी लिपीत लिहिली जाते आणि देवनागरी लिपीच्या पद्धतीला अनुसरून –

(क) लिखित अक्षरामागून लिखित अक्षर अशी डावीकडून उजवीकडे लिखित ओळ बनते;

(ख) लिखित ओळीमागून लिखित ओळ असे वरून खाली पान (पृष्ठ) बनते;

(ग) पानामागून पान असे पुढून मागे डाव्या समासाशी किंवा क्वचित् वरच्या बाजूला बांधलेली वही किंवा पुस्तक बनते.

अर्थात् या व्यवस्थेमध्ये कधीकधी पृष्ठाची जागा स्तंभ (रकाना, कॉलम) घेतो आणि बांधणी नसली तरी पान उलटण्याची क्रिया जणू बांधणी डाव्या किंवा वरच्या बाजूला असल्यासारखी होते. बांधणी नसली म्हणजे वही किंवा पुस्तक यांची जागा पोथी किंवा पोर्टफोलियो घेतो.

जेव्हा पद्याच्या ओळी एकाखाली एक लिहायच्या असतात तेव्हा पद्याची ओळ एक तर लिखित ओळीपेक्षा आखूड असू शकेल (आणि मग उरलेली जागा कोरी सुटेल) किंवा लिखित ओळ पद्याच्या ओळीसाठी अपुरी पडू शकेल (आणि मग पद्याच्या ओळीचा उरलेला भाग पुढच्या लिखित ओळीत सुरुवातीचा भाग कोरा सोडून उजव्या समासाला खेटून संपवला जाईल).

हरिची भगिनी म्हणे सुभद्रा, रुक्मिणिवहिनी, दया करा
दादांना तुम्ही कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा
शोध करा ।। ध्रु० ।।

ओळी एकाखाली एक ठेवताना त्यांची तीन प्रकारे मांडणी होऊ शकते :

(क) ठराविक समास डाव्या बाजूला सोडणे (लिपी डावीकडून उजवीकडे जात असल्यामुळे हे सोपे जाते – लेफ्ट जस्टिफिकेशन);

(ख) ओळींचे मध्य एकाखाली एक उभ्या सरळ रेषेत आणणे, (म्हणजे सेंटरिंग);

(ग) प्रदर्शनकारी मांडणी मग ती उपयुक्ततेसाठी असेल (उदाहरणार्थ कोष्टके, संवाद (सूत्र २·३ खालचे शेवटचे उदाहरण पहा), पत्राची सुरुवात आणि शेवट, वृक्षाकृती (वंशावळ, वर्गीकरण इत्यादी मांडण्या-साठी), प्रवाहाकृती (फ्लोचार्ट), नकाशातील नोंदी) किंवा कल्पना-विष्कारासाठी असेल (उदाहरणार्थ मुक्तछंदी पद्यांच्या विविध मांडण्या, चित्रबंधी पद्य (कॉंक्रीट पोइट्री), सुशोभनासाठी मांडण्या).

फक्त उजव्या बाजूला ठराविक समास सोडणे प्रदर्शनकारी मांडणीमध्ये आढ-ळते. दोन्ही बाजूला ठराविक समास सोडणे मुद्रणात सामान्यतः आढळतें.

लगतच्या ओळींच्या दरम्यानचे अंतर कमीजास्त ठेवणे आणि/किंवा डाव्या समासाची रुंदी कमीजास्त ठेवणे यांच्या मदतीने लिखित मजकूर दोन प्रकारे मांडता येतो :

(क) परिच्छेद पाडणे (परिच्छेद सामान्यतः परिच्छेदाच्या पहिल्या ओळी-पुरता जादा समास सोडून तोडता येतो (इंडेंटेशन); पण कधी परि-च्छेदाच्या पहिल्या ओळीपुरता कमी समास सोडून तोडता येतो (ऑव्हरहँग) );

(ख) पद्यपरिच्छेद किंवा कडवी पाडणे.

ठराविक समास डाव्या बाजूला सोडून मांडणी केलेल्या परिच्छेदापैकी काही भागापुरता सेट् ऑफ देता येतो – म्हणजे अशा भागाची सुरुवात नवीन ओळीवर होते आणि त्याचा शेवट झाल्यावर उरलेला मजकूर नवीन ओळीवर घेतला जातो आणि सर्व ओळींना जादा समास सोडण्यात येतो. या मजकुराकडे वाचकाचे विशेष लक्ष वेधायचे असते. (सूत्र ७ शी तुलना करावी.)

> राम गणेश गडकरी यांनी 'कवींचा कारखाना' या लेखात कवी आणि त्यांचे वाचक यांचे मार्मिक वर्गीकरण केले आहे :
>
> आजकाल कवितेच्या कारभारांत पडलेल्या लोकांचे मतभेदानुरूप दोन स्पष्ट विभाग पडलेले आहेत. यांपैकी एका वर्गाला 'नव्याचे सोयरे' व दुसऱ्या वर्गाला 'जुन्याचे सुतकी' अशीं नांवें देतां येतील.
>
> गडकऱ्यांच्या डोळ्यासमोर कोणी विशिष्ट मंडळी होती का याचा शोध घेणे रोचक ठरावे.

या उदाहरणात एका परिच्छेदापैकी मधल्या अवतरणाच्या ओळींसाठी जादा समास सोडलेला आहे. परिच्छेदाची सुरुवात इंडेंटेशनने झाली आहे. आता हे उदाहरण पहा :

अपयशाची तीन कारणे आहेत असे म्हणता येईल. या तीन कारणांचे पर-
स्परसंबंध तपासावे लागतील. ती कारणे पुढीलप्रमाणे :

(क) एकमेकांवर अविश्वास असल्यामुळे कार्य जुटीने न करणे;

(ख) साहसाचा अभाव असल्यामुळे थोडयावर संतुष्ट राहणे;

(ग) स्वतःच्या सामर्थ्याबद्दल अवास्तव कल्पना असणे.

यांपैकी प्रत्येक कारणाचा प्रथम स्वतंत्र विचार करावा लागेल.

उदाहरणादाखल घेतलेल्या या परिच्छेदात तीन सेट् ऑफ आहेत आणि त्यांची (क), (ख), (ग) ही शीर्षके आहेत. सर्व परिच्छेदाची सुरुवात जशी ऑव्हरहँगने झाली आहे त्याच प्रमाणे (क), (ख), (ग) या भागांची सुरुवातही ओव्हरहँगने झाली आहे. एकंदरीत वेगवेगळ्या मापाचे समास या ठिकाणी वापरले आहेत.

मांडणीच्या संबंधाने आणखी एक गोष्ट सांगायची म्हणजे निवेशित मजकुरामुळे येणाऱ्या विक्षेपाकडे (सूत्र ४.१ शी तुलना करा) अधिक लक्ष वेधण्यासाठी निवेशित मजकूर हलवून वेगळ्या टिपेच्या रूपाने देणे. (सूत्र ९.१ खाली दिलेले उदाहरण पहा.) ही टीप म्हणजे तळटीप (फुट्नोट) असेल, अंत्यटीप (एंडनोट) असेल, आदयटीप (फ्रंटनोट) असेल, किंवा क्वचित् सामासिकटीप (मार्जिनल नोट) असेल.

## विरामचिह्नांकन आणि मांडणी यांचे समायोजन

११. अवतरण म्हणून दिलेला मजकूर सेट् ऑफमध्ये टाकला तर अवतरण चिह्नें विकल्पाने गाळता येतील.

१२. अवतरणचिह्नांकित मजकुरात परिच्छेद तोडलेले असतील तर ते पुढील पद्धतींनी दाखवता येतील :

(क) जर सेट् ऑफ नसेल तर दुहेरी दंड किंवा दुहेरी विकल्पचिन्ह वापरावे.

(ख) जर सेट् ऑफ असेल तर परिच्छेदाच्या प्रारंभी खुलते अवतरणचिह्न घालावे आणि अवतरण संपताना एकदाच मिटते अवतरणचिह्न घालावे.

१३. ओळीच्या शेवटी पद खंडित झाल्यामुळे पुढच्या ओळीच्या प्रारंभी जर संयोगचिह्न आले (सूत्र ५.३.२ शी तुलना करा) तर ते संयोगीचिह्न विकल्पाने गाळावे.

पूर-
-ग्रस्त

किंवा :

पूर-

ग्रस्त

१४. सुटचा ओळीच्या शेवटी येणारा पूर्णविराम, अपूर्णविराम, अर्धविराम, किंवा स्वल्पविराम विकल्पाने गाळावा (विशेषत: ती ओळ मध्योमध्य किंवा सेट् ऑफमध्ये घेतली असली तर).

टीप : एकाखाली एक मांडलेला पत्ता किंवा शीर्षक यांना हे सूत्र लागू करता येईल. ही सुटी ओळ मध्योमध्य किंवा सेट् ऑफमध्ये किंवा ओव्हरहँगमध्ये किंवा डाव्या समासाला खेटून मांडलेली असेल.

१५. ज्या वेळी निवेशित मजकूर वेगळचा टिपेच्या रूपाने दिला जातो त्या वेळी त्याच्या आगेमागे द्यावयाचे कोष्ठक सहसा गाळले जातात.

टीप : संपादकीय टिपा मात्र सहसा चौकोनीकोष्ठक कायम ठेवतात. संपादकीय टिपा मूळ लेखकाच्या टिपांपेक्षा वेगळचा दिसाव्या हा हेतू यामध्ये असतो.

१६. सेट् ऑफ भागाचे शीर्षक म्हणून दिलेल्या वर्णांकचिह्नाचा खुलता कंस-कोष्ठक विकल्पाने गाळता येतो.

तीन कारणें झाली :

क) एकमेकांवर अविश्वास;

ख) धाडसाचा अभाव; आणि

ग) स्वत:बद्दल भलत्या कल्पना.

१७. परिगणनासाठी दिलेले स्वल्पविराम, अर्धविराम, किंवा पूर्णविराम सेट ऑफ भागाच्या शेवटी विकल्पाने गाळता येतो.

तीन कारणे झाली :

(क) एकमेकांवर अविश्वास

(ख) धाडसाचा अभाव

(ग) स्वत:बद्दल भलत्या कल्पना

१८. डाव्या समासाला भिडलेला खुलता महिरपीकोष्ठक किंवा चौकोनीकोष्ठक किंवा उजव्या समासाला भिडलेला मिटता महिरपीकोष्ठक किंवा चौकोनीकोष्ठक विकल्पाने गाळता येतो, मात्र महिरपीकोष्ठक दोन वा अधिक ओळींना कवेत घेणारा पाहिजे.

प्रेषक :
डॉ. ना. गो. कालेलकर,
डेकन कॉलेज,
पुणे.

१९. ओळीखाली ओळ अशी मांडणी करून पद्य अवतरण दिले आणि त्यात गाळलेली एक ओळ वा अनेक ओळी दाखवण्यासाठी योजलेले खंडविराम जरूर तर अधिक टिंबे घालून लांबवावे.

पु. शि. रेगे लिहितात–

दोन प्रहर निवांत सारें.

. . . . .

खिडकीबाहेर ढाळिता चवरी

आसुसलेला शेवगा दारचा.

या अवतरणात मुळातल्या पुढील ओळी गाळल्या आहेत :

श्रमभराने बाजेवरतीं

पांगुळलेली तूं.

## भेदकचिह्न

भेदकचिन्हांचा विचार खरे म्हणजे वर्णचिन्हे आणि शब्दाचे स्पेलिंग यांच्या बरोबर करायचा. विराम (शान्तं पापम् मधली पायमोड), द्विखंड (कोऽहम मध्ये गाळलेल्या अ बद्दलचा), आणि दुहेरी द्विखंड (लब्धवाऽऽनन्दीभवति मध्ये गाळलेल्या आ बद्दलचा) यांच्या वापराबद्दल संस्कृतमध्ये आणि म्हणून मराठीमध्ये वापरात आणलेल्या किंवा उद्धृत केलेल्या संस्कृत शब्दयोजनेमध्ये लागू पडणारे जे काही संकेत आहेत त्यांचा विचार इथे प्रस्तुत ठरणार नाही, पण ही चिह्ने पुष्कळदा मराठीत विशेष प्रकारे वापरली जातात तेवढ्यापुरता विचार इथे करणे क्रमप्राप्त आहे.

विरामाचे मराठीत काही प्रसंगी विशेष उपयोग आहेत :

(क) सुधारित लिपिव्यवस्थेत गैरसोयीची जोडाक्षरे टाळण्यासाठी उपयोग;

(ख) ध्वन्यनुकारी, उद्गारवाची, आणि इंग्रजीतून उसन्या घेतलेल्या शब्दांमध्ये भाषित अक्षराच्या (स्पोकन सिलबल) शेवटी ह्रस्व स्वरानंतर लांबवलेले व्यंजन.

लठ्‌ठ, पद्‌म (लठ्ठ, पद्म ऐवजी.)

एम्. ए- (पण : पी–एच. डी.)

मॅच्, कट् (पण : बीच, आणि पुरतेपणी मिसळून गेलेले उसने शब्द : बस, बिल.)

फट्, फट्‌दिशी (किंवा : फट्टदिशी. पण : दाराची फट.)

पाठ अन पोट. (पाठ आणि पोट ऐवजी. नको : अन्.)

द्विखंड आणि दुहेरी द्विखंड मराठीत काही प्रसंगी संस्कृतपेक्षा अगदी वेगळ्या प्रसंगी वापरले जातात. लिखित अक्षराचा अंतिम भाग म्हणून ही चिन्हे आधीचा वर्ण लांबवण्यासाठी वापरतात. ध्वन्यनुकारी, उद्‌गारवाची, अवधारणयुक्त शब्दात हा उपयोग आढळतो.

कोंबडा आरवला – कुकू ऽ चकू ऽऽ.
घंटा वाजली – घण् घण्ऽ घण्ऽऽ.
ई ऽ श् ! (तुलनेसाठी : इश् ! इश्श !)
हळूऽ जा !
काऽही बिघडलं नाही !

व्यंजने लांबवण्यासाठी मात्र द्वित्व अधिक प्रचलित आहे.

आम्ही कोण्णाच्या मिध्या नाही !

अनुस्वार (संख्या, संशय, संडास), अनुनासिक (क्वचित् वापरला जाणारा – म्याँव, घूँऽघूँऽ), आणि विसर्ग (स्वतः, दुःख, उँः किंवा उँहू) हे स्वरयोगी वर्ण-चिह्नांत मोडतात, भेदकचिह्नांत नाही. अर्धचंद्र (बॅट्, बॉल, डॅबीस, ब्यॅऽ ब्यॅऽऽ) म्हणजे खरे म्हणजे भेदकचिह्न नसून ॲ आणि ऑ या अतिरिक्त स्वरचिह्नाचा भाग आहे – हे स्वर मुख्यतः इंग्रजीमधून उसन्या घेतलेल्या शब्दांतून मिळतात (bat, ball, damn beast).

## संदर्भचिह्न

प्रदर्शनकारी मांडणीत (विशेषतः कोष्टके, शब्दकोशी मांडणी) यथोपरिचिह्न (किंवा शब्दकोशी मांडणीत दीर्घ वियोगीचिह्न म्हणजे लाँग डॅश) वरचा मजकूर खाली पुनरुक्त करण्यासाठी वापरतात. खंडविराम आणि वियोगीचिन्ह विशिष्ट कप्प्यात काही घालता येण्यासारखे नसल्याचे दाखवतात. (सूत्र ६.५ शी तुलना करा.)

## समारोप

प्रस्तुत कार्यलक्षी विवेचनातून वर्णचिह्ने आणि अंक (संख्याचिह्ने) यांना वगळले आहे. त्याचप्रमाणे विशिष्ट विषयाशी संबंधित तांत्रिक स्वरूपाची चिह्नेही वगळली आहेत – यांपैकी काही चिह्ने साध्या अ–पारिभाषिक संदर्भातही वापरली जातात (उदाहरणार्थ : + – × = % ∴ ∵ ′ ″ °). दशांशचिह्न ( . ), गुणोत्तरचिह्न ( : ), प्रमाणचिह्न ( : : ), अंशचिह्न (°) यांचा उल्लेख अगोदर केलाच आहे. एक विशेष उल्लेख करायचा म्हणजे छंदःशास्त्रामधल्या लघु–गुरु–अक्षरांसाठी असलेली

पारंपरिक चिह्ने (अनुक्रमे दंड । आणि द्विखंड ऽ) आणि पाश्चात्यांकडून घेतलेली चिन्हे (अनुक्रमे ब्रीव्ह ˘ आणि मेक्रॉन ¯ ) यांचा. काही सुधारित पण अस्वीकृत संकेत (उदाहरणार्थ वि. का. राजवाडे यांचा सगळीच अवधारणसूचके तोडून लिहिण्याचा आग्रह, जसे एक च), प्रासंगिक संकेत (अशोक रा. केळकर यांनी आपल्या **प्राचीन भारतीय साहित्यमीमांसा : एक आकलन** या प्रबंधात केलेला कोनदार कंसांचा < > आणि अवतरणचिन्हांचा उपयोग), आणि कल्पनाविष्कार-मूलक संकेत (उदाहरणार्थ तारकाचिन्हांचा सुशोभनासाठी किंवा कथनामधला सांधा–बदल सुचवण्यासाठी केलेला उपयोग) यांनाही या ठिकाणी बाजूला ठेवले आहे.

विरामचिह्ने आणि त्यांच्यासारखी इतर चिह्ने यांच्या उपयोगाबद्दल सुशिक्षित मराठीभाषकांमध्ये देखील बरीच अनास्था आणि अज्ञान आहे असे दुर्दैवाने म्हणावे लागते. परिणामी त्यांच्याबद्दल शालेय शिक्षणात आणि पाठ्यपुस्तकात जुजबीच माहिती असते. ज्यांचा त्यांच्याशी नित्य व्यावसायिक संबंध असतो अशांना म्हणजे मुद्रितशोधक, मुद्रणसंयोजक, लेखनिक, टंकनिक, लेखक मंडळींनाही फारशी माहिती नसते. 'विराम', 'द्विखंड' ही नावे माहीत नसतात, 'ब्रॅकेट' फक्त चौकोनीकोष्ठकांना म्हणतात हे माहीत नसते, 'चौकोनी कंस' म्हणण्यातला व्याघात लक्षात आलेला नसतो, तारकाचिह्नाऐवजी गुणिलेचिन्ह वापरले जाते, खंडविरामाच्या तीन टिंबांच्या ऐवजी (...) बिंदुरेषा .................. काढली जाते. काही अधिक गंभीर प्रमादांची इथे नोंद करायची तर –

(१) अपूर्णविराम / अर्धविराम, संयोगीचिह्न / वियोगीचिह्न, एकेरी अवतरण-चिह्न / दुहेरी अवतरणचिह्न, कंसकोष्ठक / चौकोनीकोष्ठक, पूर्ण-विराम / संक्षेपचिह्न, दंड / विकल्पचिह्न या जोड्यातील दर्शनी फरक आणि प्रयोगातील फरक माहीत नसणे.

(२) सेट् ऑफ, ओव्हरहँग, इंडेंटेशन यांच्याबद्दल अज्ञान असणे.

(३) काकपदचिह्न टाकल्यावर गळलेला मजकूर ओळीच्या वर किंवा समासात न लिहिता ओळीच्या खाली लिहिणे किंवा काकपदचिन्हाचा उपयोग माहीत नसल्यामुळे सरसकट बाणाचा उपयोग करणे.

(४) खंडविराम, अवतरणचिह्ने, उद्‌गारचिह्ने, किंवा अधोरेखा यांचा अतिरेकीउपयोग.

(५) वाक्यरचनेत आवश्यक असलेले शब्द कंसकोष्ठकात टाकणे. उदाहरणार्थ : त्याची (wicket) पडली.

(६) निवेशित घटकासाठी वियोगीचिह्न, स्वल्पविराम यांचा उपयोग (सूत्र ४.१ (ग), (घ) पहा) माहीत नसणे.

(७) विरामचिह्नांकनातील संधींची (सूत्र ९ पहा) कल्पना नसणे.

(८) द्विखंड चुकीच्या जागी घालणे. उदाहरणार्थ : घण्ऽ ऐवजी घऽण्.

साहजिकच विरामचिह्नांकनातील बारकावे लक्षात घेऊन त्यांचा शैलीदार उपयोग करणे किंवा अशा शैलीदार उपयोगाला दाद देणे यापासून मराठीभाषक मंडळी बरीच दूर आहेत ! (एक अपवाद चिरस्मृत पु. शि. रेगे यांचा)

## परिशिष्ट

चिह्नांकडून त्यांच्या कार्याकडे वळायचे या नेहमीच्या विवेचनपद्धतीपेक्षा कार्य-विशेषांकडून चिह्नांकडे जाणे अधिक उद्‌बोधक होते हे एव्हाना स्पष्ट व्हावे. पण त्याचबरोबर चिह्नांची वर्णानुक्रमे सूची देऊन सूत्रनिर्देश करणारी निर्देशसूचीही उपयोगी पडावी.

विरामचिह्नांकन आणि व्याकरण यांचे नातेही या मांडणीमुळे स्पष्ट होते — सूत्र १, २, ३, ४, ५ यांचा संबंध अनुक्रमे वाक्य, वाक्यबंध, वाक्यघटक पद / पदबंध, अन्वयविक्षेप, आणि पद यांच्याकडे पोचतो.

**ए-२ परिमल, १२३९-ए आपटे रस्ता, पुणे ४११००४**

# एका काचेतून अंधूकपणे

## मॅक्सीन बर्नसन

एका गोष्टीमध्ये (रूथ प्रावर झाबवला यांची? अनिमा देसाईंची?) एक म्हातारा असतो जो रोज त्याच त्याच बातम्या तीन भाषांमध्ये ऐकत असतो. लेखिकेच्या मते हे रिकामटेकडेपणाचे लक्षण आहे. मी मात्र त्या म्हाताऱ्यांच्या पुढे गेलेली आहे, कारण मी पुष्कळदा बातम्या चार भाषांमध्ये ऐकते – संस्कृत, हिंदी, मराठी आणि इंग्रजी. मी ब्रेकफास्ट तयार करीत असताना, ब्रेकफास्ट घेताना, शाळेसाठी आवराआवरी करीत असताना रेडिओ चालूच असतो आणि चार भाषांतून बातम्या माझ्या कानावर पडतात. लेखिकेने माझ्याबद्दल काय म्हटले असते हे मला ठाऊक आहे, पण ते जाऊ दे. माझ्या अनुभवाचा थोडा विचार करावासा वाटतो.

संस्कृतच्या बातम्यांकडे मी पूर्ण लक्ष दिले तर घटनांची गोळाबेरीज कल्पना येते. (काही दिवसांपूर्वी विश्वनाथ प्रतापसिंह यांची पंतप्रधानपदी नियुक्ती केली ही बातमी तशीच समजली.) तपशील मात्र माझ्या डोक्यावरून जातो. हिंदीमध्ये त्याच बातम्या ऐकल्या की मला सर्वसाधारणपणे कळतात. पण चहा पीत पीत पूर्ण लक्ष दिले तर. अन् तरीही काही बारकावे चुकतात. हिंदीत ऐकत असताना जो ताण वाटतो तो मराठी ऐकताना वाटत नाही. अर्थ सगळा समजतो तरी पण मला मुद्दाम लक्ष देऊन ऐकावे लागते. मग भांडी विसळत, वॉटर बॅग भरीत, चष्मा शोधत इंग्रजी बातम्या लागतात, माझ्या कानांवर पडतात आणि मला नकळत कळतात.

वाचनाच्या बाबतीतही असेच दिसून येते. माझा मराठी शब्दसंग्रह बऱ्यापैकी असताना सुद्धा मराठी वाचनाचा वेग इंग्रजीच्या निम्मा किंवा त्यापेक्षा कमी असावा.

असे का व्हावे? संस्कृत आणि हिन्दीचा विचार सोडाच, त्या भाषांवर मी काही प्रभुत्व मिळविलेले नाही. पण अनेक वर्षे मराठीचा अभ्यास करून, महाराष्ट्रात राहूनसुद्धा जितक्या सहजतेने मला इंग्रजी समजू शकते, तितक्या सहजतेने मराठी समजत नाही, हे मला मान्य करावे लागेल. इंग्रजी माझी राष्ट्रभाषा असल्याने ते माझ्यासाठी एक निखळ, पारदर्शक माध्यम असते. ते माध्यम स्वत:कडे

(पुढील मजकूर पान ३८ वर खाली)

# खेळ शब्दांशी....

नीलिमा गुंडी

माझ्या छोट्या मुलीचे शब्दांशी वेगवेगळ्या प्रकारें जणू खेळणे चालू असते. त्यांतील काही अनुभव सांगण्याजोगे आहेत.

तिला बडबडगीते फार आवडतात. बडबडगीतांतील नादानुकारी शब्द म्हणताना त्या नादात रंगून जाणे, हा तिचा आवडता खेळच असतो. उदा. "खारूताईची उडली दाणादाण" या ओळीतील 'दाणादाण' शब्द उच्चारताना ती डोळे विस्फारणार, दोन्ही हातांच्या जोरदार हालचाली करणार आणि योग्य त्या अक्षरावर अचूक जोर देऊन त्या शब्दाच्या उच्चाराचा आनंद मनमुराद लुटणार !

बडबडगीतांतील नादानुकारी शब्द मुलांना आवडतात कारण हे शब्द त्यांना अभिनयाला म्हणजेच कृती करायला प्रोत्साहन देतात. लहान मुलांच्यांत तर कृती (येथे 'कृती'चा अर्थ उड्या मारणे, धावणे, आवाज काढणे अशा चपळ शारीरिक हालचाली) करण्यासाठी आवश्यक असलेली क्रीडाशक्ती विपुल प्रमाणात असते. त्यामुळे "झुकझुक झुकझुक आगीनगाडी" हे गाणे तिला फार लहान वयापासून आवडते.

अशा नादानुकारी शब्दांतून नाद, क्रिया आणि शब्द यांचा संबंध ढोबळपणे मुलांच्या मनात जोडला जात असावा. कारण एकदा भिंगरीचे 'फिरकं' असे नवीनच नामकरण करून माझ्या मुलीने त्यांच्या भाषेत शब्दनिर्मिती कशी सरळ, स्वाभाविक पद्धतीने घडते, याची चुणूकच दाखवून दिली.

तिच्यासाठी तयार केलेल्या गाण्यांतील एखादी ओळ लहानसा बदल करून संदर्भानुरूप वापरणे; हाही तिच्या खेळाचाच एक प्रकार ! जसे,

"पावसा, पावसा, येणार का ?" या चालीवर,

"बाबा, बाबा, येणार का ?" म्हणत बाबांची वाट पाहायची. तसेच,

"दोन चार सरी पडल्या तरी, आजोबांना येतात शिंका भारी" ह्या ओळीत, घरात जो कोणी शिंकेल त्याचे नाव आजोबांच्या जागी घालून त्याला शिंकल्या-बरोबर ही ओळ म्हणून चिडवायचे. अगदी स्वत:लासुद्धा !

तिला अनेक विषयांवर उखाणेवजा गाणे हवे असते. तिच्या दृष्टीने 'गाणे' याचा अर्थ तिने दिलेला शब्द एखाद दुसऱ्या ओळीत अनुप्रास साधून गुंफणे. उदा.

'मेघा'वर गाणे हवे असेल तर ते इतके पुरते – " मेघा ग मेघा, काय तुझी त्रेघा,
घा धिन् घा, घा धिन् घा "

पण काही वेळा तिने गाणी करायला दिलेले विषय इतके अनपेक्षित असतात (उदा. उशी, कपाट, आमटी, कान, कंटाळा) की असे वाटावे : ही नकळत आपली फिरकीच घेत आहे नि म्हणते आहे, 'बघा, आहेत का तुमच्या भाषेत इतक्या विषयांवर गाणी ?'

या गाण्यांची आणखी गंमत म्हणजे आपण तिच्यासाठी म्हटलेल्या गाण्यात तिला काही वेळा वेगळेच गाणे सापडते. उदा. " चांदोमामा, चांदोमामा. भागलास का ?" हे तिच्यालेखी 'तुपाचं गाणं' कारण त्यात शेवटी तुपाचा उल्लेख आहे आणि सध्या तूपसाखर हा तिचा सर्वात आवडता पदार्थ आहे.

" सावळा ग रामचंद्र, माझ्या मांडीवर न्हातो." हे 'मांडीचं गाणं' कारण आईच्या मांडीवर झोपणे, हा तिचा आवडता कार्यक्रम !

एकदा तिला " श्रावणमासी हर्ष मानसी " ही कविता चालीवर ऐकवायला लागले तर एकदम आनंदून ओरडलीच, " मानसीताईचं गाणं. " मानसी ही तिची पाळणाघरातील एक मैत्रीण !

तिच्या अशा प्रतिक्रिया ऐकताना लक्षात येते की, एखाद्या गाण्यातील मध्यवर्ती प्रतिमा कोणती हे ती तिच्या भावविश्वाच्या संदर्भातून निश्चित करीत आहे. त्यामुळे आज तिची भाषा तिच्या अवतीभवतीच्या गोष्टींभोवती फेर धरून आपल्याच तालात अगदी रंगून गेली आहे.

डॉ सौ. नीलिमा गुंडी, ६/७०, लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११०३०

---

(पान ३६ वरून पुढे)

लक्ष न वेधता आशय माझ्या आकलनाला थेट पोचता करते.

माझ्या बाबतीत अशी स्थिती असली तर शाळेच्या बाहेर इंग्रजी कानावर अजिबात न पडणाऱ्यांच्या मुलांचे काय ? जी मुले स्वाभाविकपणे मराठीमध्ये बडबडू शकतात, भांडण करू शकतात, विचार करू शकतात त्यांना येत नसलेल्या इंग्रजीतून शिकवणे हा एक अजब प्रकार आहे.

मुलाला येत नसलेल्या भाषेतून सर्व विषय शिकायला लावणे म्हणजे धुक्यातून जगाचे निरीक्षण करायला लावणे. सारे अंधुक, अनाकलनीय दिसते. स्वतःच्या भाषेतून विषय शिकणे हे स्वच्छ काचेतून पाहण्यासारखे होय. माध्यम हे माध्यम म्हणूनच राहणे, ते समजण्याच्या आड येत नाही, अशा स्वाभाविक रीतीने शिकणे हा प्रत्येक मुलाचा हक्क आहे.

टपाल पेटी ४०, लक्ष्मीनगर, फलटण ४१५५२३

# साहित्यकृतीचे भाषांतर

पद्माकर दादेगावकर

## भाषांतराचे प्रकार :

मूलत: एका भाषेत असलेली साहित्यकृती जेव्हा कोणत्या तरी कारणाने दुसऱ्या भाषेत नेली वा आणली जाते, तेव्हा त्या दुसऱ्या साहित्यकृतीला भाषांतरित साहित्यकृती असे म्हणतात. म्हणजेच भाषांतरामध्ये दोन भाषांचा संबंध अपरिहार्य असतो. या दृष्टीने पाहू जाता भाषांतराचे आपण विविध प्रकार कल्पू शकतो.

भाषांतराच्या दृष्टीने साहित्यकृती ही दोन स्तरांवर वावरत असते. एक तिचा भाषिक स्तर व दुसरा तिच्या रूपाचा स्तर. कलाकृती ही कोणत्या तरी भाषेत निर्माण झालेली असते व ती कथा, कादंबरी, नाटक, काव्य अशा कोणत्यातरी रूपात स्थित असते. या दोन्ही स्तरांवरून तिचे दुसऱ्या एखाद्या भाषेत संक्रमण शक्य असते.

कधीकधी एकाच भाषेच्या दोन कालिक भेदांमध्ये साहित्यकृतीचे संक्रमण होत असते. उदा. ज्ञानेश्वरकालीन मराठीमधे लिहिल्या गेलेल्या अमृतानुभवाचे विंदा करंदीकरांनी अर्वाचिनीकरण केले. म्हणजेच तत्कालीन भाषेतील साहित्यकृती त्यांनी वर्तमानकालीन भाषेमधे आणली. अशा कालिक भाषाभेदांमधून अस्तित्वात येणाऱ्या भाषांतराला आपण "भाषांतर्गत भाषांतर" म्हणू या. भाषांतराचा आणखी एक भेद संभवतो व तो म्हणजे रूपभेद होणे. उदा. मूलतः नाटकाच्या रूपात असलेली साहित्यकृती कादंबरीच्या वा कथेच्या रूपात येणे. शेक्सपीअरची नाटके कथारूपात सांगितली गेली आहेत हे आपणास ठाऊकच आहे. अलीकडे आनंद साधले यांनी संस्कृतातील महाकाव्ये व नाटके कादंबरीच्या रूपात मराठीत आणली आहेत. इथे भाषाभेदाबरोबरच रूपभेदही झाला आहे. युनेस्को आणि रशिया अशा प्रकारच्या रूपभेदाला "भाषांतर" म्हणून मान्यता देतात. आपण त्याला 'रूप-भाषांतर" असे म्हणू या. कारण येथे मूळसाहित्यकृतीची भाषा आणि रूप ही दोन्ही बदललेली असतात.

पण कधीकधी असेही घडते की माध्यमातच फरक घडून येतो. त्याला आपण "कलांतर" असे म्हणू या. मेघदूतावर आधारित चित्रमालिका, विविध रागांवर आधारित रागमालिका, कुमारसंभवम्वर आधारित नृत्यनाट्य अथवा मूलत: साहित्यकृती असलेल्या कलाकृतीचे चित्रपटात झालेले कलांतर इत्यादी प्रकार यात मोडतील. मूलत: एका माध्यमातील कलाकृतीचे दुसऱ्या माध्यमातून आविष्करण

असा प्रकार यात असतो. भाषा हे आत्माविष्काराचे विशिष्ट चिन्हांकित माध्यम या व्यापक भूमिकेवरून पाहिले तर संगीत, नृत्य, शिल्प, चित्रपट इत्यादी देखील आत्माविष्काराची विशिष्ट चिन्हांकित माध्यमेच असतात व म्हणून एका माध्यमातून दुसऱ्या माध्यमात गेलेली कलाकृती या व्यापक अर्थाने आपण कलांतरालाही भाषांतर या प्रकारात टाकू शकू.

पण आपण सामान्यतः ज्याला भाषांतर म्हणून ओळखतो ते प्रकृतितः भिन्न असलेल्या दोन भाषांच्या संदर्भात घडून आलेले पण एकच रूप धारण करणारे भाषिक संक्रमण एवढ्या अर्थापुरतेच मर्यादित असते.

## भाषांतर प्रक्रिया

भाषांतरकर्ता जी निर्माण करतो ती मूळ संहितेची ( प्रोटो–टेक्स्ट ) सह–संहिता ( को–टेक्स्ट ) असते. या ठिकाणी मूळ संहिता ही मुख्य असते व सह–संहिता ही दुय्यम असते. पण दुय्यम असते याचा अर्थ ती निकृष्ट असते असा करण्याची गरज नाही, तर इथे दुय्यमचा अर्थ या संहितेच्या आधी मूळ संहिता अस्तित्वात असते, मूळ संहितेच्या आधारेच सहसंहिता निर्माण होत असते. सह–संहिता ही निरपेक्ष नसून मूळ संहितेच्या सापेक्ष असते, असा घ्यावयाचा आहे.

एका भाषेतील साहित्यकृती जेव्हा भाषांतराच्या सहाय्याने दुसऱ्या भाषेत नेली वा आणली जाते तेव्हा काही एक विशिष्ट प्रक्रिया घडते. तिला आपण भाषांतर–प्रक्रिया असे म्हणू या. ही प्रक्रिया पुढील आलेखाद्वारे दाखविता येईल.

येथे अ–ब या क्षेत्रात ज्या क्रिया–प्रतिक्रिया घडतात त्यांच्याद्वारा मूळ लेखकाचे म्हणणे वाचकापर्यंत पोचते. म्हणजे भाषांतरकार हा मूळ संहिता मुळात एका वाचकाच्या भूमिकेतून वाचतो. काही कारणांनी त्याला ती संहिता दुसऱ्या भाषेतील वाचकांपर्यंत न्यावी असे वाटते. हा वाचक मग लेखकाची भूमिका धारण करतो व मूळ संहिता दुसऱ्या भाषेत संहिता, म्हणून नेतो वा आणतो.

( येथे नेणे–आणणे ही दोन भिन्न क्रियापदे मी साभिप्राय वापरतो आहे. भाषांतरकार जेव्हा परकीय भाषेतून एखादी संहिता आपल्या मातृभाषेत भाषांतरित करतो तेव्हा ती संहिता तो आपल्या भाषेत आणतो असे मी म्हणेन. या उलट तो आपल्या मातृभाषेतील एखादी संहिता जेव्हा परक्या भाषेत भाषांतरित करतो तेव्हा तो ती संहिता त्या भाषेत नेतो असे मी म्हणेन. भाषांतरकर्ता कितीही भाषांमधे पारंगत असला तरी त्याला आपली मातृभाषा ही नेहमीच जास्त जवळची असते. म्हणून नेणे–आणणे हा क्रियाभेद करणे मला इष्ट वाटते.

याच संदर्भात साहित्यनिर्मितीच्या प्रक्रियेकडेही आपण काळजीपूर्वक पाहिले पाहिजे. लेखक जीवनात नानाविध अनुभव घेत असतो. यांपैकी काही त्याच्या

निर्मितिशक्तीला धक्के देणारे असतात. हे धक्के बालकवींसारखे प्राय: संवादी असतील वा मर्ढेकरांसारखे प्राय: विरोधी असतील. या धक्क्यांनी त्याच्या निर्मितिशक्तीला जे हेलकावे बसतात ते तो काव्यरूपाने आविष्कृत करतो. ही प्रक्रिया आलेखरूपाने आपल्याला अशी मांडता येईल.

अनुभव ------→ धक्का --------→ काव्य

भाषांतर हीदेखील एक निर्मितीच असते. फक्त ती प्रत्यक्ष जीवनातील अनुभवांवर आधारित नसते, तर त्या अनुभवांच्या आधारे जे काव्य निर्माण झालेले असते त्यावर आधारित असते. दुसऱ्या शब्दात त्याचा अनुभव हा प्रत्यक्ष नसतो तर परोक्ष असतो. तो जेव्हा मूळ काव्य वाचतो तेव्हा त्याला त्या काव्यवाचनातून कवीचा मूळ अनुभव प्रत्ययाला येतो. या धक्क्याने त्याच्या निर्मितीशक्तीला जे हेलकावे बसतात ते तो त्या मूळ साहित्यकृतीच्या भाषांतराद्वारे आविष्कृत करतो. ही प्रक्रिया आपल्याला अशी दाखविता येईल —

मूळ कविता ------→ धक्का -------→ भाषांतर

मूळ अनुभव व त्याचा धक्का आणि मूळ कवितेतून प्रकट झालेला अनुभव व त्याचा धक्का यांच्या प्रमाणात अर्थातच फरक पडतो. मूळ अनुभव जेवढा तीव्र असेल तेवढ्याच तीव्रतेने तो काव्यात प्रकट असेलच असे नाही. तसेच तो शुद्ध स्वरूपातच प्रकट झालेला असेल असे नाही. त्यात इतरही काही अनुभव येऊन मिसळले असण्याची शक्यता आहे. त्याचप्रमाणे काही वाङ्मयीन संकेत, काही वैयक्तिक आवडीनिवडीही त्यात येऊन मिसळलेल्या असण्याची शक्यता आहे. या सर्वांना घेऊन जेव्हा मूळ संहिता वाचकाला भेटते तेव्हा तिची धक्का देण्याची वा अनुभव आविष्कृत करण्याची क्षमता काही प्रमाणात कमी झालेली असण्याची शक्यता असते. अशी साहित्यकृती भाषांतरकर्त्याला जो अनुभव देते तो पुन्हा त्याच्या स्वत:च्या वाङ्मयीन व्यक्तित्वाने मर्यादित झालेला असण्याची शक्यताही असते. या सर्व मर्यादांसह भाषांतरकर्ता तो अनुभव दुसऱ्या भाषेतून देऊ पाहतो तेव्हा मूळ संहितेतील अनुभव भाषांतरात क्षीण झालेला असण्याची शक्यता खूपच मोठी असते. याच जोडीला दोन भाषांमधील मूलभूत भेद, वाङ्मयीन संकेतांचे भिन्नपण इत्यादीही अडचणी असतातच. हे झाले मूळ लेखक जेव्हा श्रेष्ठ निर्मितिशील लेखक असेल तेव्हाचे. पण काही वेळा असेही घडू शकते की, मूळ लेखकापेक्षा भाषांतरकार हा अधिक श्रेष्ठ निर्मितिशील लेखक असतो, अशा वेळी कदाचित मूळ संहितेतील अनुभव क्षीण असू शकेल व तो भाषांतरात अधिक तीव्र होऊन येऊ शकेल. साहित्यकृतींच्या भाषांतरांमध्ये हे असे अधिकउणे चालतच असते. प्रा. निशिकांत मिरजकर यांनी भाषांतरविद्येतील हे गणित

क्ष = क्ष + य किंवा क्ष–य





अनुक्रमणिका

अशा सूत्रात मांडले आहे.

वरील विवेचनावरून हे स्पष्ट होईल की साहित्यकृतींचे भाषांतर हे मूळ कृती-पेक्षा कधी काही अधिक देत असते तर कधी काही वजा करून देत असते. भाषांतरित संहिता ही सह-संहिता किंवा दुय्यम संहिता असते असे मी सुरुवातीला का म्हटले ते यावरून स्पष्ट होईल. साहित्यकृतींचे भाषांतर करणारा हा स्वतः निर्मितिशील लेखक असला पाहिजे. तो केवळ साधा वाचक असून भागणार नाही हेही यावरून स्पष्ट व्हावे.

## भाषांतरांच्या प्रेरणा

भाषांतरे का केली जातात, ती कोण करवून घेतो व ती कोण करतो हेही प्रश्न साहित्यकृतीच्या भाषांतरांमध्ये महत्त्वाचे असतात.

भाषांतरांचा इतिहास पाहिला तर आपल्याला असे दिसेल की, इ. स. च्या दुसऱ्या शतकात टॉलेमी ( द्वितीय ) याने बायबलचे हिब्रूमधून ग्रीक भाषेत जे भाषांतर करवून घेतले होते तिथे भाषांतराचा प्रारंभ आहे. हे भाषांतर त्या काळात आवश्यक वाटले याचे कारण हिब्रू समाजाचा इजिप्तमध्ये त्यांच्या मातृभाषेशी संबंध तुटला होता हे आहे. त्यामुळे मूळ मातृभाषेतील संहितेचे प्रचलित व्यवहारभाषेमध्ये भाषांतर करवून घेणे आवश्यक ठरले होते. भाषांतरे का केली जातात या प्रश्नाचे एक उत्तर हे आहे की, एखाद्या संहितेची मूळ भाषा एखाद्या समाजाला अवगत नसते तेव्हा ती एक संहिता आपल्याला अवगत असणाऱ्या भाषेत आणण्याच्या गरजेतून भाषांतरे होतात. बायबलची नानाविध भाषांतरे वा आपल्याकडील वेद, उपनिषदे किंवा रामायण-महाभारत यांची भाषांतरे या गरजेतून निर्माण झालेली आहेत. हे सामाजिक पातळीवरचे कारण आहे. समाजधारणा वा समाजाची प्रगती यासाठी ज्या संहिता आवश्यक वाटतील त्यांचे भाषांतर घडवून आणले जाते. वैयक्तिक पातळीवर मात्र वैयक्तिक आवड हाच भाषांतरामागचा निकष असतो.

याच अनुषंगाने भाषांतरे कोण घडवून आणतो हाही प्रश्न विचारावयास हवा. सामाजिकदृष्ट्या महत्त्वाचे वाटणारे ग्रंथ आमंत्रण देऊन भाषांतरित करवून घेणाऱ्या साधारणतः संस्था असतात. प्राचीन काळी राजे-रजवाडे, धर्मपीठे यांच्याद्वारा हे कार्य होई. त्यांचा प्रभाव क्षीण झाला तेव्हा सामाजिक संस्था वा समाजहितैषी प्रकाशनसंस्था या कार्यात उतरल्या. आपल्याकडील साहित्यसंस्कृती मंडळ, साहित्य अकादमी वा नॅशनल बुक ट्रस्ट यांसारख्या संस्थांचे उदाहरण या संदर्भात देता येईल. ज्या संहिता निखळ वाङ्मयीनदृष्ट्या महत्त्वाच्या असतात त्यांचे भाषांतर सामान्यतः वैयक्तिक आवडीतून भाषांतरकर्ता स्वतःच करतो व त्यांच्या

प्रकाशनामागेही वैयक्तिक आवडनिवड आणि व्यापार हीच कारणे अधिक महत्त्वाची असतात.

भाषांतरे कोण करतो या प्रश्नाचे उत्तर तर अगदी स्पष्टच आहे की, मूळ संहितेची भाषा आणि ज्या भाषेत भाषांतर करावयाचे आहे ती भाषा अशा दोन्ही भाषांवर ज्याचे प्रभुत्व आहे अशाच व्यक्तीकडे भाषांतराचे कार्य सोपविले जाते वा अशीच व्यक्ती वैयक्तिक आवडीतून भाषांतराला प्रवृत्त होते.

काही विशिष्ट सामाजिक वा वाङ्मयीन हेतूने जेव्हा भाषांतरे करवून घेतली जातात तेव्हा त्या भाषांतरांच्या परीक्षणांचा प्रश्न महत्त्वाचा बनतो. कारण ती भाषांतरे मूळ संहितेशी ईमान राखणारी आहेत की नाहीत हे जाणून घेणे आवश्यक असते. अशा भाषांतरांमागचा हेतू परक्या भाषेत उपलब्ध असलेले ज्ञान वा एखादी श्रेष्ठ साहित्यकृती आपल्या भाषेत उपलब्ध करून देणे हाच असतो. त्यामुळे भाषांतरकर्त्याच्या वैयक्तिक आवडीनिवडी वा पूर्वग्रह अशा भाषांतरात आलेले नाहीत ना हे पाहणे महत्त्वाचे असते. त्यासाठी विशेषज्ञाची नेमणूक आवश्यक ठरते. भाषांतरकार आणि दोन्ही भाषांवर प्रभुत्व असणारा असा विशेषज्ञ यांच्यावर संपूर्ण विश्वास टाकावाच लागतो. त्यामुळे भाषांतरकार आणि विशेषज्ञ या दोघांवरही एक मोठीच नैतिक जबाबदारी असते. विशेषतः धार्मिक ग्रंथांच्या भाषांतरामध्ये तर ही जबाबदारी खूपच महत्त्वाची ठरते. पाठ्यपुस्तकातील "मोहम्मद पैगंबराचे पलायन" या शब्दांवरून काही वर्षांपूर्वी भडकलेला वाद आपणांस आठवतच असेल. ज्या ग्रंथाविषयी एखाद्या समाजाच्या भावना फार तीव्र असतात त्यांच्या भाषांतराबाबत म्हणूनच फार काळजीपूर्वक वागावे लागते.

### भाषांतरामधील समस्या :

भाषांतर ही एक सातत्याने चालणारी प्रक्रिया असते. मूळ कलाकृती एकदा सिद्ध झाली की, ती त्या भाषेच्या वाङ्मयामध्ये स्थिर होत असते. तिच्यात सहसा बदल घडून येत नाही. पण भाषांतराचे तसे नसते. एकाच कलाकृतीची भिन्नभिन्न काळांमध्ये अनेक भाषांतरे झालेली दिसून येतात. मराठीचेच उदाहरण द्यायचे तर महादेवशास्त्री कोल्हटकर, देवल आणि शिरवाडकर यांनी केलेली ऑथेल्लोची भाषांतरे किंवा मेघदूतम्ची चिपळूणकर, श्रीखंडे, सबनीस, चिंतामणराव देशमुख, ग. नी. कात्रे, ना. ग. गोरे, कुसुमाग्रज, बा. भ. बोरकर, वसंत पटवर्धन, वसंत बापट इत्यादींनी केलेली भाभांतरे यांचा निर्देश करता येईल. आधी झालेले एखाद्या साहित्यकृतीचे भाषांतर अपुरे वा असमाधानकारक वाटल्याने तिचे नव्याने भाषांतर केले जाते. म्हणजे एक प्रकारे नंतरची भाषांतरे ही आधीच्या भाषांतरावरील अप्रत्यक्ष टीकाच असतात. हे असमाधान का निर्माण होत असते

या प्रश्नाचा विचार करू लागलो की, आपण भाषांतरामधील समस्यांपर्यंत येऊन पोचतो.

त्यांपैकी दोन भाषांच्या प्रकृतींमधील भिन्नता ही सर्वप्रथम लक्षात येणारी समस्या असते. संस्कृतचेच उदाहरण घ्या: समासांच्या सहाय्याने कमीत कमी शब्दात जास्तीत जास्त आशय सांगण्याची त्या भाषेची जी प्रकृती आहे ती इतर कोणत्याही आधुनिक भारतीय भाषांमधे आढळत नसल्यामुळे संस्कृत संहितांची या भाषांमधील भाषांतरे ही पुष्कळदा सैल वाटू लागतात. रा. श्री. जोगांनी या संदर्भात म्हटले आहे की, " अनुवादकर्त्याची कसोटी पाहण्याची अचूक जागा म्हणजे मुळातील अर्थान्तरन्यास–स्वरूपाच्या ओळी." या दृष्टीने मेघदूतातील एक अर्थान्तरन्यास व त्याची काही भाषांतरे पाहिल्यास संस्कृतातील सामासिक शब्द-योजनेतून येणारी आशयघनता मराठीत कशी सैलावते ते दिसून येईल.

मेघदूतातील ओळ अशी आहे –

" याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा "

" गुणवंताकडून याचना निष्फळ झाली तरी चांगले पण दुर्जनाकडून ती सफळ होणे चांगले नाही ", असा या ओळीचा आशय आहे.

बोरकरच्या ओळीचे भाषांतर

" अव्हेरावे खलऋण, बरी सज्जनांची उपेक्षा "

असे करतात. मूळ ओळीत " मोघा " व " लब्धकामा " या विशेषणांमधे जो तोल आहे तो बोरकरांच्या ओळीतील " खलऋण " व " सज्जनांची उपेक्षा " यात नाही. याचना करणाऱ्याला उपकारांचा अव्हेर करण्याचे मानसिक धैर्य असते असे बोरकरांचे भाषांतर सूचित करते. मुळात अशी व्यंजना नाही.

गणेश नीलकंठ कात्रे यांचे भाषांतर

" दुष्टात्म्याची उपकृति नको थोर नाही म्हणोत "

असे आहे. येथे वाच्य आशय बराचसा आलेला असला तरी दुष्टात्मे आणि थोर ही बहुवचने मूळ ओळीतील ध्वनिसौंदर्य हरवून बसतात. कुणाही स्वाभिमानी माणसाला याचना करणे आवडत नसते. त्यामुळेच कालिदास यक्षाच्या संदर्भात येथे मुद्दाम " अधिगुणे ", " अधमे " यातून एकवचन वापरतो. हा ध्वनी कात्र्यांच्या आणि बोरकरांच्याही भाषांतरांमधून निसटून गेला आहे.

या दोहोंपेक्षा चिंतामणराव देशमुखांचे भाषांतर मुळाशी पुष्कळच जवळिक साधणारे आहे. ते–

" " ना " श्रेष्ठाची तरिहि बरवी " हो " नको दुर्जनाची "

अशी आहे. " मोघा ", " लब्धकामा " यातील तोल " ना ", " हो " यातून देश-मुखांनी चांगला साधला आहे. पण तरीही मुळातील संधी व समासांनी आलेली

घट्ट वीण किंवा ओजोगुण देशमुखांच्या भाषांतरातील सुटया शब्दांमुळे सैल झाल्याचे जाणवतेच.

संस्कृतातीलच आणखी एक उदाहरण घेऊ या : शाकुंतलम्च्या शेवटच्या अंकात सर्वदमनाच्या तावडीतून सिंहाच्या छाव्याला सोडविण्यासाठी त्याच्यापुढे एक खेळण धरून ऋषिपत्नी त्याला म्हणते –

" शकुंतलावण्यं पश्य "

– हा पक्षी बघ, किती सुंदर आहे – असा त्या वाक्याचा आशय आहे. पण 'शकुंत' आणि 'लावण्य' यातील 'शकुंतला' एवढाच ध्वनी बालकाच्या माहितीचा असल्यामुळे तो ताबडतोब "कुठे आहे माझी आई ? " असा प्रश्न करतो. आता या पताकास्थानकाचे मराठीत भाषांतर कसे करणार ?

"पक्षीसौंदर्य बघ" असे केले तर "कुठे आहे माझी आई ?" या प्रश्नाचा आधारच निघून जातो. त्यामुळे " शकुंतलावण्य पहा " असे केवळ क्रियापदापुरते भाषांतर करणे हाच एकमेव पर्याय उरतो.

भाषांतर कोणता वाचक डोळ्यापुढे ठेवून केले आहे यावरही काही समस्या अवलंबून असतात. युरोपीय वाचकांसाठी "पाथेर पांचाली" चे भाषांतर झाले आहे त्यातील पहिलेच वाक्य, "हरिहर रे, ए ब्राह्मिण, लीव्हज् इन धिस टाऊन." असे आहे. यातले "ए ब्राह्मिण" हे विशेषण मूळ बंगाली वाक्यात नाही. कारण "रे" हे त्याचे आडनावच ब्राम्हणत्व सिद्ध करते. पण भाषांतरकाराचे म्हणणे असे की, "रे" हे आडनाव फक्त ब्राह्मणातच असते ही गोष्ट माझ्या वाचकाला ठाऊक असण्याची शक्यता नाही व त्यामुळे मी तो जास्तीचा शब्द टाकला. पण भाषांतर वाचणाऱ्याचा मात्र असा समज होण्याची शक्यता आहे की हा शब्द मुळातीलच आहे.

यावरून आणखी एक गोष्ट लक्षात येईल की, ज्या साहित्यकृतीत सांस्कृतिक संदर्भांची रेलचेल असते तिचे भाषांतर करणे ही तर फारच मोठी अवघड जबाबदारी असते. ज्या वाचकासाठी भाषांतर करावयाचे त्याला ते सांस्कृतिक संदर्भ ज्ञात करून देण्यासाठी अशा प्रकारच्या भरीची किंवा तळटीपांची मदत घेणे आवश्यक होऊन बसते.

काही वेळा असेही घडते की सांस्कृतिक संदर्भासोबतच भौगोलिक संदर्भही महत्त्वाचे ठरतात. एक मनोरंजक उदाहरण मी आपणास देऊ इच्छितो. सुभाषितरत्नभांडागारम्मध्ये एक श्लोक आहे. तो असा –

" अस्तं गतवति सवितरि भर्तरि मधुपं निवेश्य कोषान्ते ।
कमलिन्योऽपि रमन्ते किमत्र चित्रं मृगाक्षीणाम् ।"

या श्लोकाचा आशय असा आहे की, आपला पती जो सूर्य तो अस्ताला गेल्यानंतर

कमलिनी आपला प्रियकर जो भ्रमर त्याला आपल्या कोषात घेऊन रममाण होतात. तेव्हा मृगनयना स्त्रियाही पती गावाला गेल्यावर तशाच वागत असतील तर त्यात नवल ते काय ?

या श्लोकाचे जपानी भाषेत भाषांतर करण्याचा प्रश्न आला तेव्हा जपानी भाषिकांकडून असे सांगण्यात आले की या श्लोकाचे जपानी भाषेत भाषांतर करता येणे अशक्य आहे. कारण संस्कृतात जरी सूर्य पुल्लिंगी असला तरी जपानीत तो स्त्रीलिंगी आहे. त्यामुळे त्याला प्रियकराची उपमा देता येणार नाही ! तसेच सूर्य हा तेथे बौद्धधर्माचे प्रतीक असल्यामुळे वंचित पतीच्या भूमिकेत तेथील लोक त्याला स्वीकारणार नाहीत. पण याहीपेक्षा मोठी अडचण नैसर्गिक आहे. कारण जपानमध्ये कमळं उमलतात ती ग्रीष्म ऋतूत आणि भुंगे विहरतात ते वसंत ऋतूत ! त्यामुळे या दोघांची प्रियकर-प्रेयसी म्हणून सांगड घालता येणे निसर्गतःच अशक्य आहे ! तेव्हा या श्लोकाला कितीही तळटीपा दिल्या तरी याचे जपानी भाषांतर स्वीकार्य ठरणे कठीणच जाणार !

## भाषांतरविद्या :

भाषांतरांमध्ये या ज्या नानाविध समस्या निर्माण होत असतात त्यामुळेच भाषांतरांची समीक्षा ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट ठरते. भाषांतरांच्या संदर्भात सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाषांतरकारावर असलेली नैतिक जबाबदारी. भाषांतर शक्य तो मुळाशी प्रामाणिक असले पाहिजे. त्यात भाषांतरकाराने मनःपूत काढघाली करू नयेत. भाषांतरांमधील काढघालींचे प्रमाण जर आपण काढून पाहिले तर असे दिसेल की स्वतः लेखकानेच केलेली जी भाषांतरे असतात त्यात अशा काढघालींचे प्रमाण फार मोठे असते. आपलीच कलाकृती लेखक भाषांतरित करीत असतो त्यामुळे पुष्कळदा त्याला नवेच काही जोडण्याचा मोह होतो व त्याबद्दल त्याला काही खंतही वाटत नाही. पण दुसऱ्याची कलाकृती जेव्हा भाषांतरासाठी घेतली जाते तेव्हा तिच्यात अधिक काही जोडण्याचा मोह प्रायः टाळला जातो. त्यामुळे मूळ लेखकानेच केलेल्या भाषांतरापेक्षा दुसऱ्या लेखकाने केलेले भाषांतर अधिक प्रामाणिक असण्याची शक्यता जास्त असते.

भाषांतरांची समीक्षा कशी करावी हा यातूनच निर्माण होणारा आणखी एक महत्त्वाचा प्रश्न.

भाषांतरांची योग्य ती समीक्षा करावयाची तर समीक्षकाला भाषांतरप्रक्रियेचे सखोल ज्ञान असणे आवश्यक असते. पण आजकाल घडताना दिसते ते असे की, ज्याला भाषांतराच्या संदर्भातील दोन्ही भाषा अवगत आहेत अशा किंवा ज्याने काही एक भाषांतरकार्य केले आहे अशा व्यक्तीकडे समीक्षेचे कार्य सोपवून दिले

जाते. अशी व्यक्ती करते काय तर मूळ कलाकृती त्याने वाचलेली असेल तर तिचेच गुणवर्णन करीत बसते व भाषांतराबद्दल "ते चांगले उतरले आहे", "बरे आहे" "वाईट आहे" अशी सरधोपट विधाने करते. क्वचित कधी मूळ व भाषांतर यांची तुलना करते. पण मूळ त्याने वाचलेलेच नसेल तर मग अशा समीक्षकाच्या कोलांट-उड्यांची कल्पनाच केलेली बरी !

भाषांतरित झालेली संहिता आणि तिची घटक तत्त्वे या गोष्टी प्रत्यक्ष डोळ्यांना दिसणाऱ्या असतात म्हणून बव्हंश समीक्षेत त्यांचाच फक्त विचार केला जातो. याउलट ज्या प्रक्रियेच्या साहाय्याने मूळ संहितेचे भाषांतर घडत असते त्या प्रक्रियेतील नानाविध घटक हे केवळ अनुभवगम्य असतात, ते कोणत्याही संहितेतून प्रत्यक्ष उपलब्ध होत नसतात. पण भाषांतरांची केवळ समीक्षा करण्यासाठीच नव्हे तर भाषांतरविद्येच्या नानाविध अंगांचा शोध घेण्यासाठी देखील या अनुभवगम्य घटकांची विस्तृत तपासणी आवश्यक ठरते. भाषांतराच्या प्रक्रियेमध्ये भाषांतरकाराच्या मानसिक पातळीवर ज्या घडामोडी घडल्या असतील त्या शोधून पाहणे ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची असते. पण सध्यातरी या शोधासाठी एकच मार्ग उपलब्ध आहे व तो म्हणजे "उलट भाषांतर" (रीव्हर्स ट्रान्सलेशन). कोणत्याही साहित्यकृतीच्या भाषांतरामध्ये जी एकमार्गी काढघाल झालेली असते ती अचूकपणे शोधण्याचा एकमेव मार्ग तिची पूर्वलक्षी पुनर्रचना करणे हाच सध्यातरी दिसतो आहे.

पूर्वलक्षी पुनर्रचना कशी उपयुक्त ठरते याचे एक अगदी साधे उदाहरण आपण पाहू – विंदा करंदीकरांची एक कविता आहे : "सावल्या". तिचे त्यांनी स्वतःच इंग्रजीमध्ये भाषांतर केले आहे : "शॅडोज्." त्यात त्यांनी "म्हाताऱ्याच्या वासनेसारख्या" या शब्दांचे भाषांतर "लाइक दि डिझायर्स ऑफ ॲन ओल्ड मॅन" असे केले आहे. हे भाषांतर भाषांतर म्हणून न वाचता नुसतीच एक इंग्रजी कविता म्हणून वाचली तर "डिझायर्स" या शब्दाला आपला आक्षेप असणार नाही. पण या इंग्रजी भाषांतराची पूर्वलक्षी पुनर्रचना केली आणि ती मूळ मराठी कवितेशी ताडून पाहिली तर असे दिसेल की पुनर्रचनेत "म्हाताऱ्याच्या इच्छांसारख्या" असे शब्द येतील व मुळातील "वासना" या शब्दातील अर्थगौरव भाषांतरात निसटलेला आहे हे लक्षात येईल. पण असे उलट भाषांतर लहान-लहानशा कवितांच्या बाबतीत शक्य असले तरी विस्ताराने मोठ्या असलेल्या साहित्यकृतींच्या बाबतीत ते व्यवहार्य नसते.

तेव्हा भाषांतराची समीक्षा करावयाची असो, भाषांतरविषयक काही सिद्धांत बांधावयाचे असोत वा भाषांतरविषयक काही संशोधन करावयाचे असो, त्यासाठी काही एक शिस्त पाळली पाहिजे.





अनुक्रमणिका

या शिस्तीचा पहिला नियम म्हणजे भाषांतराला महत्त्वाचे स्थान दिले पाहिजे, त्याच्या मूळ साहित्यकृतीला नव्हे. याची कारणे मी आपणास सांगतो. भाषांतरे का होतात या प्रश्नाचे जर आपण चिंतन केले तर आपल्या हे लक्षात येईल की भाषांतरे ही लक्ष्य भाषेच्या व संस्कृतीच्या आस्थेपोटी केली जात असतात. मूळ भाषेच्या वा संस्कृतीच्या आस्थेपोटी नव्हे. उदा. मेघदूताची इतकी भाषांतरे मराठीत का झाली ? ही मराठी भाषांतरे संस्कृत भाषेत अथवा त्या भाषेच्या संस्कृतीत काही भर घालू शकत नाहीत हे उघडच आहे. कारण मेघदूतम् हे कालिदासाने लिहिलेले काव्य अपरिवर्तनीय आहे. तेव्हा या भाषांतराने संस्कृतचे भले होणार नसून झाले तर मराठीचेच भले होणार आहे हे उघड आहे. दुसऱ्या दृष्टीने पाहिले तर भाषांतराला मूळ भाषेत फारसे महत्त्व नसते. शेक्सपीअरचा 'ऑथेल्लो' मराठीत झुंजारराव बनून आला की आणखी कुणी याला मूळ इंग्रजी संहितेच्या दृष्टिकोणातून काहीच महत्त्व नाही. कारण त्या गोष्टीचा मूळ संहितेवर काहीच परिणाम घडत नसतो. पण ज्या मराठीत हे भाषांतर घडून आलेले असते तिच्यावर मात्र ते निश्चितच परिणाम करू शकते. त्यामुळे मूळ साहित्यकृती आणि तिचे भाषांतर यांची केवळ तुलना करीत बसण्यापेक्षा भाषांतरित साहित्यकृतींचा लक्ष्य भाषेमधे एक वर्ग कल्पावा व या वर्गातील साहित्यकृतींची वैशिष्टये तपासावीत हा मार्ग अधिक फलदायी ठरण्याची शक्यता अधिक असते. लक्ष्य भाषेतील विशिष्ट वर्गाच्या कलाकृती म्हणून जर भाषांतरांकडे आपण पाहू लागलो तर या वर्गातील कलाकृतींनी त्या भाषेला वा त्या संस्कृतीला केलेले योगदान शोधणे सोपे जाते व अशा संशोधनाने लक्ष्य भाषेत आणि लक्ष्य संस्कृतीत भाषांतरांच्या माध्यमातून आलेल्या नव्या प्रवाहाचे स्वच्छ चित्र आपणांसमोर उभे राहू शकते. संशोधनाच्या पातळीवर भाषांतरांचा अभ्यास करावयाचा असेल तर या मार्गाने केला तरच काही फळ देऊ शकेल, केवळ मूळ संहिता व तिचे भाषांतर यांचे तौलनिक अध्ययन म्हणजे वेळेचा व श्रमांचा फक्त अपव्यय ठरेल.

## भाषांतराचे महत्त्व :

भारतासारख्या बहुविध भाषा असणाऱ्या देशात एका भाषेतील साहित्यकृती दुसऱ्या भाषेत उपलब्ध होणे अत्यंत महत्त्वाचे आहे. भिन्न भाषांचा अडसर असल्यामुळे आपण सारे भारतीय असूनही एकमेकांपासून दुरावल्यासारखे होतो. पण केरळची निसर्गरम्य पार्श्वभूमी लाभलेली व तेथील मातीतून फुलून आलेली एखादी कथा मला मराठीत वाचायला मिळाली तर केरळबद्दल आत्ता माझ्या मनात जे ताटस्थ्य आहे ते जाऊन तेथे आस्था उत्पन्न होऊ शकेल. प्रांतागणिक आमचे रीतिरिवाज वेगवेगळे असतील, सणवार भिन्नभिन्न असतील, कपडयालत्त्यांमधे फरक असेल,

चेहरेमोहरे निरनिराळे असतील, पण तरीही या सर्वांच्या आत भारतीय संस्कृतीची एक अविच्छिन्न धारा आम्हा सर्वांमधून वाहते आहे या गोष्टीचा प्रत्यय आम्हांला भाषांतरेच देऊ शकतील. भाषांतरांच्या द्वाराच आम्हाला आमच्या सांघिक स्वरूपाची, आमच्या आंतरिक एकत्वाची प्रभावी जाणीव प्राप्त होऊ शकेल. परवा-परवाची गोष्ट आहे. आमच्या देशात एका प्रांतातील लेखक दुसऱ्या प्रांताचा श्रेष्ठ लेखक म्हणून मिरवीत होता. उदाहरणार्थ, बेंद्रे मूळचे मराठीचे पण ते कानडीचे श्रेष्ठ लेखक झाले. मधुसूदन राव उरियातील श्रेष्ठ लेखक ठरले पण तेही मूळचे मराठीच. या गोष्टी योगायोगाच्या असतात असे आपण म्हणू शकता. पण एका भाषेतील श्रेष्ठ लेखक दुसऱ्या भाषेत नेणे अगदी आपल्या हातातले असते. भाषांतरांच्या द्वारा. तेव्हा निदान ही वाट तरी आपण सर्वसामर्थ्याने चोखाळली पाहिजे.

३ – ३ – ९०० / ४ कुतुबीगुडा, उमा बाग, हैदराबाद ५०००२७




प्रेषक : मुकुंद धायगुडे,
संगणक केंद्र, इंडियन इन्स्टिटय़ूट ऑफ मॅनेजमेंट, अहमदाबाद ३८००१५

# साहित्येतर अनुवाद-प्रक्रिया

## विजया देव

'ललितसाहित्येतर वाङ्मयाच्या अनुवादाचा विचार' यातून जाहिरात, रहदारीच्या सूचनांच्या पाट्या, सामानाच्या खोक्यांवरील सूचना, वस्तूंच्या वापरांविषयीची माहिती हे वाङ्मयक्षेत्र वगळलेले आहे.

विचारप्रधान विवेचनग्रंथ, परिभाषाकेंद्रित तांत्रिक वाङ्मय यांच्या अनुवादातील प्रश्नांचा विचार येथे केला आहे. अशा वाङ्मयातील भाषेचे स्वरूप कसे असते हे थोडक्यात पाहून त्याच्या अनुवादाकडे वळू.

अशा वाङ्मयाची भाषा स्वतःकडे लक्ष वेधून घेत नाही तर विचारविषयाकडे वाचकाचे लक्ष वेधते. येथे भाषिक चिन्ह पारदर्शी असते असे म्हणता येईल. म्हणजे भाषिक चिन्ह आणि त्याने निर्देशित केलेली वस्तू यांत एकास एक असा संबंध असतो. नेमका अर्थ अभिप्रेत असतो. या प्रकारच्या भाषिक वापरात संदिग्धता किंवा अनेकार्थता नसते. भाषेच्या एरवीच्या वापरात ऐतिहासिक संदर्भ खोलवर रुजलेले असतात, भाषा सामाजिक-संस्कृतिक संदर्भांनी संपृक्त असते. काही विवेचनग्रंथांतही अशी संदर्भसंपृक्तता असते. उदाहरणार्थ म. फुल्यांचे वाङ्मय किंवा डॉ. पु. ग. सहस्रबुद्धयांचे लेखन. पण जसजसा हा भाषेचा वापर तांत्रिक, परिभाषाकेंद्रित होईल तसतशी भाषा या संदर्भांपासून मुक्त, गणिती होऊ लागते. उदा. वैज्ञानिक वाङ्मय. यामुळे आणि भाषिक चिन्हात यादृच्छिकता असल्यामुळे एका भाषेत मांडलेले विचार दुसऱ्या भाषेत पुष्कळच सुकरपणे मांडता येतात.

ज्या वाङ्मयातील भाषा अधिकाधिक परिभाषाकेंद्रित असते, तेथे ती सांस्कृतिक संदर्भमुक्त असतें हे खरे, पण त्याच वेळी ती सैद्धांतिक विचारगर्भ असते. (theory - laden terms).

अशा ललितसाहित्येतर वाङ्मयकृतीच्या अनुवादात विचारांचा काटेकोरपणा, सुसूत्रता, वस्तुनिष्ठता अपेक्षित असते. आणि हे गुण भाषेच्या डौलदारपणापेक्षा वरचढ ठरतात. कारण, समजा नियमांचा । कायद्यांचा अनुवाद असेल तर मूळ नियमात । कायद्यात कालांतराने बदल झाले तर पाठोपाठ अनुवादात बदल करणे सोयीचे होते, हे एक. दुसरे म्हणजे, एका विचारवंताने मांडलेल्या सिद्धांतांभोवती उपसिद्धांत मांडले जातात, मागून येणारे विचारवंत त्यात भर घालतात व एक विचारप्रणाली सिद्ध होते. जर सुरुवातीपासून अनुवादात काटेकोरपणा असला तर नंतर भर पडत गेलेले विचार अनुवादित कृतींमधून, पुढच्या आवृत्त्यांमधून आणणं सोपं जातं. म्हणून काटेकोरपणाला एवढं महत्त्व.

या काटेकोर साक्षेपापायी नेहमी भाषेच्या डौलदारपणावर पाणी सोडावंच लागतं असं नाही ( अर्थात् ललित साहित्यातील भाषेचा डौलदारपणा वेगळा आणि अशा वैचारिक वाङ्मयातील वेगळा, हे सांगायला हवंच असं नाही, ) तर हे उदाहरण स. गं. मालशे यांच्या ' साहित्य सिद्धांत ' या (वेलेक व वॉरन यांच्या) ग्रंथाच्या अनुवादातील.

( " In ' Stopping by woods ', ' miles to go before I sleep is literally true of the traveller, we assure, but in the language of natural symbolism to ' sleep ' is to ' die ' and if one complies by contract the ' woods are lovely, dark and deep ' ( all three adjectives panegyric) with the moral and Social check of ' promises to keep ' one can't wholly reject the passing, not insisted on equation of aesthetic contemplation with some kind of ceasing to be as a responsible person.

(Welleck and warren, 1949 : 190)

' Stopping by woods ' मधील ' miles to go before I sleep ' ही गोष्ट आपण कवितेतील प्रवाशाच्या संदर्भात अक्षरशः खरी धरून चालतो. परंतु निसर्गसिद्ध प्रतीकसृष्टीच्या परिभाषेत ' झोप ' ' sleep ' म्हणजे मरण ' die ' होय. तसेच ' woods are lovely, dark and deep ' (तिन्ही विशेषणे एकजात प्रशंसापर) याची ' promises to keep ' यामागील नैतिक व सामाजिक नियंत्रक तत्त्वाशी विरोधी पद्धतीची सांगड घातल्यास सौंदर्यचिंतन म्हणजे व्यक्तिगत जबाबदारीचे स्थगन या प्रकारचे जाता जाता साधलेले पण अनाग्रही समीकरण आपणास संपूर्णपणे नाकारता येणार नाही.

(मालशे, १९८२ : २०३)

वरील वाक्यात, मूळ ' passing ' या विशेषणाचा ' जाता जाता साधलेले ' असा विस्तार, व उलट ' not insisted on'चा ' अनाग्रही ' हा संक्षेप अनुवादात सौंदर्य आणतोच. त्याशिवाय, ' natural 'चा मालशांनी केलेला ' निसर्गसिद्ध ' असा अनुवाद ' नैसर्गिक ' या शब्दाच्या निवडीपेक्षा नेमका व अर्थवाही आहे.

आपला अहं विसर्जित करून मूळ लेखकाचे विचार, कल्पना, त्याची भाषा स्वतःच्या अंगी मुरवावी लागते हा प्रत्येकच अनुवादकाचा अनुभव आहे. हे ललितानुवादातच होते असे नाही, तर ललितेतर वाङ्मयाच्या अनुवादातही हा अनुभव येतो. अनुवादकाला हे जमले आहे की नाही याचा पडताळा वाचकालाही येतो. उदा. ' Translation versus Interpretation ' या गौरी देशपांडे यांच्या निबंधाचा अंजनी खेर यांनी केलेला अनुवाद. गौरी देशपांडे मराठीतील ललित

लेखिका आहेत. त्यांनी इंग्रजीतून लिहिलेल्या लेखाचा अनुवाद अंजनी खेर यांनी केलेला आहे. या अनुवादातील मराठीचा वापर गौरी देशपांडे यांच्या मराठी वाचकाला परिचित शैलीशी मिळताजुळता आहे. ( भाषांतर : छायानुवाद की भावानुवाद ? गौरी देशपांडे : अनु. अंजनी खेर – पृ. ३ : मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन, वर्ष ४, अं. १, हिवाळा १९८६).

इथे एक मुद्दा उपस्थित होतो, मूळ लेखात आवश्यकता भासल्यास सुधारणा, चुकीची दुरुस्ती अनुवादकाने करावी की नाही ? याला सरसकट होय किंवा नाही असे उत्तर देण्याऐवजी, असे करता येईल –

एखादा लेखक ईप्सित भाषेत ( target language ) आणायचा हे ध्येय असेल तर मुळातील लेखकाची एकादी चूकही तशीच राहू द्यावी व ती थेट ईप्सित वाचकापर्यंत जावी. फार तर तळटीप देऊन सुधारणा दुरुस्ती करावी. उदा. फ्रॉईड मराठीत आणायचा हे ध्येय असेल तर त्याच्या लेखनातील एखादी चूक अनुवादातही राहू द्यावी. पण एखादा विषय ईप्सित भाषेत आणायचा आहे, महत्त्व लेखकाला नाही असे असेल, तर मुळातील चूक अनुवादकाने दुरुस्त करून घ्यावी.

उदाहरणार्थ कोशरचनाविचार (Lexicography) मराठीत आणायचा आहे तर Zgusta या लेखकाच्या Manual of Lexicography तील एखादी उणीव सुधारून घ्यावी. कारण महत्त्व लेखकाला नसून विषयाला आहे. यापैकी पहिल्या प्रकारचा अनुवाद 'व्यूहमोचन' decoding translation आणि दुसरा व्यूह-पुनर्बन्धन re-encoding translation आहे. डॉ. अशोक रा. केळकरांनी हा भेद सुचवला आहे.

आता परिभाषा : परिभाषा हा सर्वांनाच कधी ना कधी त्रास देणारा प्रश्न आहे. संकल्पनात्मक संज्ञांना ईप्सित भाषेत समतुल्य संज्ञा आवश्यक असतात. पण गुणबोधक शब्द उदा. यंत्रांचे विविध भाग यांच्यासाठी रुळलेले परभाषेतील शब्द तसेच राहू द्यावे. ते काढून त्याजागी ईप्सित भाषेतील नव्याने तयार केलेले शब्द वापरण्याचा खटाटोप शक्यतो टाळावा.

एकाच संकल्पनेसाठी पर्यायी संज्ञा असणं, समानार्थी संज्ञा असणं हे भाषेच्या समृद्धीचं लक्षण नसून वैचारिक डळमळीतपणाचं आहे. उदा. Morpheme साठी रूपिम, पदिम किंवा concept साठी कल्पना, संकल्पना. अर्थात एखादा विषय भाषेत नव्याने मांडला जात असताना असे होणे साहजिक आहे, पण साक्षेपाने इतर पर्याय दूर करून संज्ञांचे प्रमाणीकरण होणे आवश्यक आहे.

पारिभाषिक संज्ञा या सर्व भारतीय भाषांसाठी एकच असाव्या. संस्कृत हा पाया असल्यामुळे हे शक्यही आहे. आज होणारे ललितेतर वाङ्मयाचे अनुवाद दोन प्रकारचे आहेत, (१) इंग्लिशमधून भारतीय भाषांमध्ये आणि (२) भारतीय



अनुक्रमणिका

भाषांतर्गत. ॲरिस्टॉटलच्या पोएटिक्सचा अनुवाद सर्व भारतीय भाषांमध्ये होतो. किंवा रा. भा. पाटणकर, अशोक रा. केळकर यांच्या मराठी लेखनाचा अनुवाद इतर भारतीय भाषांमध्ये होतो. तो हिंदीमार्फत इतर भाषांमध्ये होणे हाही मार्ग आहेच. अशाच वेळी एका व्यासपीठावर, एका विषयावर चर्चा होणे समान परिभाषेअभावी शक्य होत नाही. कारण हेच उदाहरण बघा – चरित्र या शब्दाचा मराठीतला अर्थ biography हिंदीत character (चरित्र अभिनेता) आणि तेलुगूत चरित्र म्हणजे इतिहास.

गंभीर वैचारिक लेखनात संस्कृतप्रचुर भाषा असणं हा हळूहळू शैलीचा मानदंड मराठीत होऊ बघतोय. आणि परिभाषेसाठी संस्कृत तर जवळजवळ अनिवार्य आहे.

पारिभाषिक संज्ञांमध्ये संस्कृत शब्द येणारच. तेव्हा इतरत्र अनुवादात संस्कृत-प्रचुर रचना होता होईतो टाळणं हा समतोल साधता येईल. Origin चा अनुवाद मूलोत्पत्ती करण्याऐवजी 'उगम' राहू द्यावा. कसे ?

मराठी विभाग, स० प० महाविद्यालय, पुणे ४११ ०३०

## 'प्राण्यांना कसे हाकलतात'

'कुत्रा जातो 'हाड्' शब्दानें, 'शुक्' म्हणतां माऊ ।
'हाड्या' म्हणावे जोरानें कीं, पळे दूर काऊ ।। १ ।।
'खुड्' म्हणतां तीं सर्व कोंबडीं खुराड्यांत जातीं ।
गाढव हाकला एकसारखी करून 'झ्या, झ्या' ती ।। २ ।।
'हुड्', ऐकोनी मंदगतीनें मेंढी ती निघतें ।
'हुर्या' म्हणतां शेळीबाई उड्या घेत पळते ।। ३ ।।
'थिर्र' ऐकुनी बागडणारी करडे पळताती ।
'हेट्' शब्दानें खूण करोनी घोडे दौडविती ।। ४ ।।
म्हैस, टोणगा घालवण्याला 'हल्या, हल्या'चि, करा ।
सर्वां हाकिले 'चल्, निघ्' म्हणतां माणुस जाई घरा ।। ५ ।।

– काशिनाथ परशुराम साने, शिक्षक राजुरी, जि. पुणे.
'बालबोधमेवा' जून ३१, पृ. १४१




अनुक्रमणिका

# शब्दांची अनोखी दुनिया

( मराठी शब्दसमीक्षा । ले. मु. श्री. कानडे । सन पब्लिकेशन्स, पुणे । ७ मे १९८९ : पृष्ठे : – १२७ । ४५ रु. )

## परीक्षण लेखक : कल्याण काळे

डॉ. मु. श्री. कानडे यांचे नाव मराठी नाट्यसमीक्षा, संतवाङ्मय, मराठीचे ऐतिहासिक भाषाविज्ञान या क्षेत्रांत सर्वविश्रुत आहे, मराठीतील मध्ययुगीन / अर्वाचीन ग्रंथकृती व ग्रंथकार यांच्या शब्दसंग्रहांच्या अभ्यासाला धरून लिहिलेल्या त्यांच्या स्फुट लेखांचा हा संग्रह आहे. यातील एक लेख वगळता बाकीचे सर्व लेख पूर्वी सुटया स्वरूपात इतरत्र प्रसिद्ध झाले आहेत. निरनिराळ्या ठिकाणी विखुरलेल्या या लेखांचे एक सूत्र लक्षात घेऊन त्यांचा हा एकत्रित संग्रह तयार करण्यात आलेला आहे. मराठी भाषेच्या इतिहासातील विविध टप्प्यांवरील ग्रंथकृती किंवा ग्रंथकार यांच्या भाषेचा केवळ शब्दसंग्रहाच्या अंगाने विश्लेषणात्मक अभ्यास हा या सर्व लेखांचा मुख्य विषय आहे. त्यादृष्टीने ' मराठी शब्दसमीक्षा ' हे या संग्रहाचे नाव अन्वर्थक वाटते.

भाषेचा मुख्य भाग म्हणजे तिचे व्याकरण हा असला तरी तिचा दर्शनी भाग तिचा शब्दसंग्रह हाच असतो. म्हणूनच परकीय भाषेबद्दल बोलताना सर्वसामान्य माणूस तिच्या वैशिष्टयपूर्ण शब्दांबद्दलच बोलत असतो. म्हणून शब्दसंग्रहाचे महत्त्व मान्य करायला हवे. डॉ० अशोक केळकरांनी भाषेतील शब्दसंग्रह हा तिचा निधी असून तिचे व्याकरण हा तिचा विधी ( व्यवहार ) होय असे म्हटले आहे. भाषेच्या व्याकरणाप्रमाणेच तिच्या शब्दसंग्रहाचा अभ्यास हेही महत्त्वाचे अभ्यासक्षेत्र आहे. डॉ० कानडे यांनी आपल्या अभ्यासासाठी हेच क्षेत्र निवडले आहे.

शब्दांचा अभ्यास अनेक अंगांनी करता येण्यासारखा आहे. एका विशिष्ट काळाच्या संदर्भात भाषेत असलेल्या शब्दांच्या स्वरूपाचा विचार करणे हा त्यांचा वर्णनात्मक अभ्यास होय. पण भिन्न भिन्न काळात शब्दांच्या रूपामध्ये, अर्थामध्ये जी परिवर्तने होत जातात त्यांचा अभ्यास म्हणजे शब्दांचा ऐतिहासिक अभ्यास होय. साहित्यकृतीमध्ये वापरलेल्या शब्दांच्या औचित्याच्या, सौंदर्याच्या दृष्टिकोनातून विचार हा त्यांचा शैलीवैज्ञानिक अभ्यास होय. डॉ० कानड्यांचे क्षेत्र मुख्यत: ऐतिहासिक पद्धतीने अभ्यास करण्याचे असले तरी इतर दोन्ही पद्धतींकडे त्यांनी दुर्लक्ष केलेले नाही. किंबहुना या तीनही पद्धतींचा एक सुंदर समन्वय त्यांच्या शब्दसमीक्षेमध्ये दृष्टीस पडतो.





अनुक्रमणिका

या संग्रहात एकूण बारा लेख असून त्यांपैकी सहा लेख मध्ययुगीन वाङ्मया-संबंधीचे असून सहा अर्वाचीन वाङ्मयासंबंधीचे आहेत, असे स्थूलमानाने म्हणता येईल. मध्ययुगीन वाङ्मयासंबंधीच्या लेखात चार लेख लीळाचरित्र, ज्ञानेश्वरी, एकनाथ आणि तुकाराम यांच्या शब्दसंग्रहाच्या विश्लेषक अभ्यासाचे आहेत. या अभ्यासामध्ये डॉ० कानडे प्रथम त्या कृतीचे अथवा ग्रंथकाराचे वाङ्मयेतिहासातील स्थान स्पष्ट करून त्याच्या भाषेची वैशिष्ट्ये स्पष्ट करतात. त्यानंतर त्या कृती-तील अथवा ग्रंथकाराच्या समग्र लेखनातील शब्दसंग्रहाचा अभ्यास प्रस्तुत करतात. त्यामध्ये तत्सम, तद्भव, देशी, परप्रांतीय, फारसी इ. शब्दांचे प्रमाण काय, समा-सांचे स्वरूप काय; त्यातील दीर्घसमास, संकरितसमास करण्याच्या प्रवृत्ती; अभ्यस्त शब्दांचे स्वरूप, या शब्दांचे लेखन इ. अंगांनी विवेचन येते. प्राचीन वाङ्मयकृतींच्या या अभ्यासामध्ये डॉ० कानडे ऐतिहासिक पद्धतीचीही भर घाल-तात. ग्रंथकृतीतील शब्दांची उत्तरकालीन रूपान्तरं, अर्थान्तरं यांची ते चर्चा करतात. हे करताना ते त्या प्रक्रियेची चिकित्साही करतात.

प्राचीन वाङ्मयासंबंधीच्या लेखांमध्ये दोन लेख फारसीच्या प्रभावासंबंधी आहेत. रामदासांच्या वाङ्मयातील फारसी शब्दांचा आणि शिवाजी महाराजांच्या पत्रातील फारसी शब्दांचा त्यांनी त्यात विचार केला आहे. या लेखात फारसीच्या प्रभावाची ऐतिहासिक कारणमीमांसा करून वरील लेखनात फारसीचे प्रमाण काय, ते विषयानुरूप, लेखकाच्या विवेक्षेनुरूप कसे बदलते इत्यादींचे विवेचन केले आहे.

अर्वाचीन वाङ्मयासंबंधीच्या सहा लेखांत तीन लेख फुले, राजवाडे आणि राम गणेश गडकरी यांच्या शब्दसंग्रहासंबंधी आहेत. त्यात वरील प्रमाणेच तत्सम, तद्भव, इ. वर्गवारी आहे, पण त्याबरोबर इंग्रजीचा प्रभाव; नवीन विषयांचा समावेश त्यामुळे पडलेली नवीन शब्दांची भर, नवीन शब्दांची निर्मिती, शब्दांच्या निवडीतील धोरणं इ. अंगांनी चर्चाही केलेली आहे. एका लेखात आज प्रचारातून गेलेल्या एकोणिसाव्या शतकातील शब्दांची चर्चा केली आहे. मराठीच्या प्रमाण भाषेची घडण चालू असलेल्या त्या काळात कित्येक शब्द नव्याने आले पण पुढे दुसरे चांगले पर्याय येताच कसे मागे पडले हे त्यावरून स्पष्ट होते. एका लेखात एकोणिसाव्या शतकातील आदानप्रक्रियेने आलेल्या इंग्रजी शब्दांचे लेखन कसे होई याची मनोरंजक माहिती सादर केली आहे. शेवटच्या लेखात समकालीन अशा पडघवली, गोतावळा, पाचोळा या तीन कादंबऱ्या ( ज्यांचा डॉ. कानडे प्रादेशिक कादंबऱ्या असा उल्लेख करतात ) घेऊन त्यांच्या शब्दसंग्रहांचा तौलनिक अभ्यास त्यांनी प्रस्तुत केलेला आहे. या तीन कादंबऱ्या निरनिराळ्या प्रदेशातील भाषांचा वापर करतात. त्यात संस्कृत, फारसी, इंग्रजी इ. शब्द कसकसे येतात, त्यांचे प्रमाण

काय, हे प्रमाण कमीजास्त होण्याची कारणे कोणती इ. ची चर्चा केलेली आहे. पुस्तकातील विषयांची ही हाताळणी लक्षात घेता केवळ शब्दांचाच अभ्यास हा सुद्धा किती व्यापक आणि बहुविध असतो हे लक्षात येईल.

या लेखांच्या अंतरंगात शिरल्यावर माहितीची पुष्कळ दालनं आपल्यापुढे खुली होतात. शब्दांची वर्गवारी करून त्या त्या प्रकारच्या जंत्र्या देणं एवढ्यावर डॉ. कानडे समाधान मानणारे नाहीत, तर प्रत्येक विशेषाची ऐतिहासिक व भाषाशास्त्रीय चिकित्सा करण्याची त्यांची पद्धती आहे. त्यामुळे अनेक वैशिष्ट्यांवरची त्यांची निरीक्षणे आपले लक्ष वेधून घेतात. लीळाचरित्र आणि ज्ञानेश्वरी यांच्या शब्दसंग्रहांचे विश्लेषण केले असता त्यातील तत्सम, तद्भव, देशी इ. शब्दांचे प्रमाण सारखेच येत असल्याचे दाखवून ज्ञानेश्वरांच्या काळात तरी गद्यभाषा व पद्यभाषा यांमध्ये फारसे अंतर पडलेले नव्हते हा महत्त्वाचा निष्कर्ष ते नोंदवतात. लीळाचरित्रात समकालीन इतर ग्रंथांमध्ये न आढळणारे शब्द येतात याचे कारण लीळाचरित्राचा विषयच समकालीन ग्रंथांपेक्षा वेगळा असल्याने ही तफावत अपरिहार्य आहे असे ते दाखवून देतात. एकनाथमहाराज ज्ञानेश्वर व रामदास यांच्यामधला दुवा असून ते ज्ञानेश्वरांचे शब्द आपल्या लेखनात जसे वापरतात तसेच रामदासही एकनाथांचे शब्द स्वतःच्या लेखनात रुळवतात, या गोष्टीकडे ते आपले लक्ष वेधतात. एकनाथांच्या लेखनात फारसी शब्दांचा वापर जास्त असला तरी फारसी शब्दांचे प्रमाण त्यांच्या लेखनात विषयानुसार कसे कमी–जास्त होते ही गोष्ट ते स्पष्ट करतात. हीच गोष्ट रामदासांच्या लेखनाबाबतही आढळून येते. रामदासांच्या आध्यात्मिक कृतींमध्ये फारसी शब्द फारच कमी येतात, याउलट राजकीय स्वरूपाच्या लेखनात त्यांची संख्या जास्त आढळते. आंग्लपूर्व काळातील इंग्रजी शब्दांचे लेखन केवळ श्रवणसंस्कारातून येत असल्याने ते कसे विचित्र होई, अव्वल इंग्रजीत ते संक्रमणावस्थेत असल्याने कसें बहुपर्यायी असे आणि चिपळूणकरोत्तर कालखंडात ते कसे स्थिरावले याचे सुंदर विवेचन ते करतात. एकोणिसाव्या शतकातील लोप पावलेल्या शब्दांचा विचार करताना लोकहितवादी, म. फुले आणि चिपळूणकर यांच्या भाषेचा तौलनिक विचार ते करतात. लोकहितवादींचे विचार इंग्रजी वाङ्मयाने प्रभावित असले तरी त्यांची भाषा अस्सल देशी आहे, आणि चिपळूणकर राष्ट्रीय विचारांनी प्रभावित झाले असले तरी त्यांच्या भाषेवर इंग्रजीचा प्रभाव आहे, असे त्यांचे निरीक्षण आहे. म. फुले यांच्या भाषेत बोलीची सहजता आणि ग्रांथिक भाषेची कृत्रिमता हे दोन्ही विशेष प्रकट झालेले आहेत हे महत्त्वाचे निरीक्षण त्यांनी नोंदवलेले आहे. एकोणिसाव्या शतकात लेखनव्यवहारात अनेक नवीन विषय आल्याने शब्दसंग्रहात खूपच नवीन भर पडली याकडे त्यांनी लक्ष वेधलेले आहे. अशा प्रकारे विश्लेषणावर आधारित ठोस

निष्कर्षांमुळे त्यांची ही शब्दसमीक्षा विचारप्रवर्तक झाली आहे.

या शब्दसमीक्षेमध्ये इतिहासाचार्य राजवाडे, कृ. पां. कुलकर्णी, प्रा. म. अ. करंदीकर, डॉ. यू. म. पठाण इ. च्या अभ्यासांची वेळोवेळी दखल घेण्यात आली आहे. पण वरील पूर्वसूरींची शब्दसमीक्षा केवळ भाषाविज्ञानाच्या स्वरूपाची होती. डॉ. कानडे यांच्या समीक्षेमध्यें मधूनमधून साहित्यिक दृष्टीही डोकावते. विशेषतः ज्ञानेश्वरी, तुकाराम, म. फुले, गडकरी यांच्या शब्दसंग्रहांचा विचार करताना ते केवळ भाषावैज्ञानिक माहिती न देता या लेखकांच्या शब्दनिवडीची रसग्राहक पद्धतीने चर्चा करतात. म. फुल्यांचे नवीन विषयाची अभिव्यक्ती करण्याचे सामर्थ्य शब्दांद्वारे कसे प्रकट होते हे ते स्पष्ट करतात. 'त्यांची भाषा ही चवीला खारट तुरट असलेले परंतु औषधी गुणांनी युक्त असलेले रानफळ आहे' या महर्षी वि. रा. शिंद्यांच्या विधानाकडे आपले लक्ष वेधतात. नव्या विचारांच्या परिणामकारक आविष्कारासाठी म. फुल्यांनी घडवलेल्या घरकुंड (छोटे घर), दोरेवाला (जानवे घालणारा ब्राह्मण), भटवाई (ब्राह्मण लोक), पोटवाहू (पोटभरू) इ. अनेक अर्थवाही शब्दांचा निर्देश करतात. गडकऱ्यांच्या भाषेतील विषारी निराशा, कडू भीती, भितरा ओशाळेपणा या शब्दप्रयोगांचे नावीन्य ते स्पष्ट करतात. साम्याभ्यासाने गडकरी नवीन शब्द सहेतुकपणे कसे घडवतात हें सोदाहरण स्पष्ट करतात. हा सर्व अभ्यास आधुनिक शैलीविज्ञानाच्या अंगाने जाणारा आहे.

निरनिराळ्या निमित्तांनी, निरनिराळ्या काळात लिहिल्या गेलेल्या या लेखांचे संग्रहरूपाने संपादन करताना काही काळजी घेणे आवश्यक होते. ती घेतली न गेल्यामुळे लेखांच्या प्रास्ताविक भागात बऱ्याच वेळा पुनरुक्ती झाली आहे. राजवाड्यांनी शिवकाळातील तीन पत्रांचे जे विश्लेषण केले त्याची नोंद दोनदा झाली आहे. पण डॉ. कानड्यांना या त्रुटीची जाणीव आहे व अपरिहार्य परिस्थितीमुळे तिकडे लक्ष द्यायला जमले नाही हे त्यांनी प्रांजळपणे कबूल केले आहे. शिवाजी महाराजांच्या पत्रात १६७४ पासून पुढे फारसी शब्द कमी येऊ लागले, त्यांच्यानंतर उत्तरोत्तर हे प्रमाण कमी होत गेले असे ते म्हणतात. पण उत्तर पेशवाईतील कागदपत्रांमध्ये फारसीचे प्रमाण वाढले असे श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी म्हटले आहे व ते वाढण्याची कारणमीमांसाही त्यांनी केली आहे (इतिहास आणि कल्पित) त्यामुळे डॉ. कानड्यांच्या निष्कर्षाला थोडीशी मुरड घालावी लागते. आपल्या लेखांना टिपणांचे स्वरूप दिल्यामुळे त्यांचे विवेचन अनेकदा त्रोटक झाले आहे. शब्दांच्या स्वरूपाचे सूत्रवजा विवेचन करून उदाहरणांच्या याद्या देण्यापेक्षा त्या उदाहरणांचीच जरा अधिक चर्चा केली असती तर चालण्यासारखे होते. पण डॉ. कानड्यांचाभर विस्तारापेक्षा आटोपशीरपणावर अधिक आहे.

(पुढील मजकूर पान ६२ वर पहा)

# वर्ष ७, १९८९ ची सूची

## लेखकसूची

## लेख – सूची

(पान ५७ वरून पुढे)

एक गोष्ट मात्र कबूल केली पाहिजे ती ही की हा ग्रंथ वाचत असताना शब्दांच्या एका अनोखी दुनियेमध्ये आपण वावरत असल्याचे जाणवत राहते. शब्दांची ही चर्चा जितकी शास्त्रीय तितकीच माहितीपूर्ण व मनोरंजक झाली आहे. शास्त्रीय माहिती आणि वैविध्यपूर्ण उदाहरणे यांमुळे हा ग्रंथ कुतूहलपूर्ती करणारा झालाच आहे पण त्याबरोबरच बौद्धिक मनोरंजन करणाराही झाला आहे.

मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७

# मराठीतील भाषाविषयक लेखन १९८९

(भाषा आणि जीवनच्या सातव्या वर्षाच्या (१९८९) अंकातील लेखांची सूची याच अंकात स्वतंत्रपणे दिली असल्यामुळे ते लेख या सूचीत समाविष्ट केले नाहीत.)

- भाषांतराद्वारे साहित्याची देवाण-घेवाण आवश्यक / साहित्यसूची दिवाळी / १० : ९–१०, ऑक्टो–नोव्हें. १९८९.
- मराठी नियतकालिकांचे अनुवाद कार्य ( संकलित ) / साहित्यसूची दिवाळी / १० : ९–१०, ऑक्टो–नोव्हें. १९८९.
- मराठी भाषा विशेषांक ( संपादकीय ) / रुची–मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.
- मराठी भाषेची अनास्था / श्री सरस्वतीमंदिर, २ : ३, शके १८२४ (१९०२) / पुनर्मुद्रण : आलोचना, २८ : १, सप्टें. १९८९.
- माध्यम : विशेष पुरवणी. साप्ताहिक सकाळ (पुणे) / २ : २८; १९८९–०६–२४ पृ. ८–१२. (समावेश : परिसंवाद : चित्रा नाईक, अशोक रा. केळकर, वि. गो. कुलकर्णी, ग. प्र. प्रधान, आशा मुंडले, भालचंद्र फडके, शिशिर ज. मोडक, विद्यासागर महाजन, निर्मला सारडा; वाचक–चर्चा संकलन : प्र. ल. गावडे; निवडक प्रतिक्रिया : उल्हास पारगावकर, सुनंदा एडके, सविता गंगाधर कुलकर्णी)
- लोकराज्य, रुचि, हेमांगी यांचे मराठी विशेषांक / आलोचना, २८ : ३, नोव्हेंबर १९८९.
- शिक्षणक्रमात मराठी भाषेसंबंधी दिसून येणाऱ्या अनास्थेसंबंधी दोन शब्द / श्री सरस्वतीमंदिर, २ : १, शके १८२४ (१९०२) / पुनर्मुद्रण, आलोचना २८ : १, सप्टें. १९८९.
- स्वभाषेचे महत्त्व / ज्ञानोदयांतील विचारांचे संकलन १८४६–१८६५ / पुनर्मुद्रण : आलोचना. २८ : १, सप्टें. १९८९.

अर्जुनवाडकर लीला / एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति (मेघदूताची चार भाषांतरे) / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

अवचट सुगंधा / म्हणून मी अनुवादित साहित्य वाचते / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.





अनुक्रमणिका

आलासे वीणा / तथापि भाषांतरलोलुपो ऽ हम् / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

इंदापूरकर चं. द. / मराठी भाषा : व्यवस्था आणि अध्यापन / कॉन्टिनेन्टल पुणे / १९८९. पृष्ठे–एकोणीस + ४६३.

उजगारे निरंजन / सोविएत भावकविता / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

कठारे भीमाशंकर / मराठी साहित्यातील औद्योगिक विषयाचे दालन । रुची–मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

कर्वे माधव / एका अनुवादाची अद्‌भुत कथा / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

कानडे मु. श्री. / मध्ययुगीन काळातील ग्रंथांचा भाषिक अभ्यास / समावेश : भाषा व साहित्य : संशोधन खंड ३ रा / संपा. डॉ. वसंत स. जोशी व प्रा. म. ना. अदवंत / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / मे १९८९.

कानडे मु. श्री. / मराठी शब्दसमीक्षा / सन पब्लिकेशन्स, पुणे / मे १९८९. पृष्ठे १२७.

कानिटकर य. शं. / भाषा व शब्दसाधना / लोकराज्य, जागतिक मराठी परिषद विशेषांक / १९८९–०८–१६.

कानिटकर यशवंत / राज्यकारभार मराठीतून का होत नाही ? / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

कालेलकर ना. गो. / राष्ट्रभाषा ? / अभिरुची, दिवाळी १९५१ / पुनर्मुद्रण : आलोचना २८ : १ / सप्टेंबर १९८९.

काळे कल्याण / कोशरचनाशास्त्र / समावेश – भाषा व साहित्य : संशोधन खंड ३ रा / संपा. डॉ. वसंत स. जोशी व प्रा. म. ना. अदवंत / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / जून १९८९.

काळे कल्याण / ज्ञानेश्वरीचा शैलीवैज्ञानिक अभ्यास / साहित्यसूची, १० : ५ / जून १९८९.

काळे कल्याण / सांकेतिक आणि गुप्त भाषा : परंपरा व स्वरूप ले. प्रभाकर मांडे (ग्रंथपरीक्षण) । आलोचना, २७ : १० / जून १९८९.

काळे कल्याण / स्त्रियांच्या भाषेतील परिवर्तन / समावेश – स्त्रीजीवनविषयक स्थित्यंतर. पुणे परिसर (१८७६–१९५०) / भारतीय इतिहास संकलन समिती – प्रकाशन विभाग / पुणे, १९८९.

कुलकर्णी उमा / अनुवाद : दूध नव्हे, ताक ! / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

कुलकर्णी मधुकाका / अनुवादित पुस्तके व आम्ही प्रकाशक / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

कुलकर्णी व. दि. / अनुवाद–रूपांतरासंबंधी काहीसे ('उमरु शतकम्'च्या निमित्ताने) / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

कुलकर्णी वसंत विष्णू / मराठी भाषा व वाङ्मयसंशोधन आणि ग्रंथसूची / साहित्यसूची, १० : ६ / जुलै १९८९.

कुलकर्णी विरूपाक्ष / साहित्यक्षेत्रातील अनुवादकार्याचे स्थान / साहित्यसूची वर्ष १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

कुलकर्णी सुमती / मी अनुवादित साहित्य का वाचते ? / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

कुसुमाग्रज / भाषा : समाजाच्या अस्मितेचा व अस्तित्वाचा मूलाधार / रुची, मराठी भाषा विशेषांक, ऑगस्ट १९८९.

केतकर कुमार / वर्ण, वर्ग आणि भाषा, नवे विग्रह / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

केतकर श्रीधर व्यंकटेश / स्वभाषेचा अभिमानी वर्ग कोण ? / द्वितीय शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेले भाषण । विद्यासेवक, ३ : ३, मे १९२६ / पुनर्मुद्रण : आलोचना, २८ : १ / सप्टेंबर १९८९.

केळकर अशोक रा. / एक वाङ्मयप्रेमी भाषावैज्ञानिक / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, अंक २४९ / एप्रिल–जून १९८९.

केळकर इंदुमती / राष्ट्रीय एकात्मतेसाठी अनुवाद / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

केळकर मृणालिनी / घेतला वसा / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

केळशीकर शं. हि. / शब्दार्थ मीमांसा / परामर्श, १० : ४ / फेब्रु. १९८९.

कोलारकर राम / अनुवाद : एक प्रभावी माध्यम / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

खोपकर अरुण / साहित्य आणि चित्रपट / आलोचना, २७ : ६, फेब्रु. १९८९.

गडकरी माधव / मराठीच्या सर्वांगीण अभ्युदयासाठी जागतिक मराठी परिषद / लोकराज्य, जागतिक मराठी परिषद विशेषांक १९८९. ०८. १६.

गाडगीळ बाळ / इंग्लिश×मराठी, मराठी×इंग्लिश / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

गिते विलास / साहित्यानुवाद, महत्त्व, प्रयत्न व प्रतिसाद / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

गुजर जयवंत / माझ्या जीवनातील एक समृद्ध अनुभवविश्व / साहित्यसूची १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

गुंजीकर रा. भि. / आपल्या भाषेची स्थिती / विविधज्ञानविस्तार, ६ : ७ / डिसें. १८७३ / पुनर्मुद्रण : आलोचना : २८ : १ / सप्टेंबर १९८९.

गोखले करुणा / पुल्लिंगी शब्दांचे प्राधान्य / महाराष्ट्र टाइम्स, रविवार १९८९ / ०७ . ३०.

गोखले द. न. / भाषिक व्यवहारातील आलेख (लेखांक ६) / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, अंक २४९ / एप्रिल–जून १९८९.

गोखले सुधा / माझी (अमेरिकन) मुलगी मराठी माध्यमात / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

गोगटे शकुंतला / रुचिपालट / साहित्यसूची १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

घारे दीपक / मराठीचे बदलते प्रवाह / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

चव्हाण यशवंतराव / मायबोली ही ज्ञानभाषा म्हणून विकसित झाली पाहिजे / लोकराज्य, राजभाषा विशेषांक १९७९ / पुनर्मुद्रण : लोकराज्य, जागतिक मराठी परिषद विशेषांक / १९८९. ०८ . १६.

चाफेकर श्री. ना. / मराठीची अभिवृद्धी / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

चितळे पद्माकर / लेखन आणि व्याकरण / साहित्यसूची, १० : ६ / जुलै १९८९.

चित्रे दिलीप पुरुषोत्तम / कवितेचे भाषांतर : आलोचना, २७ : ५ / जानेवारी १९८९.

जोशी पद्माकर वि. / अनुवाद : संवादमाध्यम / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

जोशी लक्ष्मणशास्त्री / संस्कृतीचा मुख्य गाभा म्हणजे भाषा / लोकराज्य, जागतिक मराठी परिषद विशेषांक / १९८९. ०८ . १६.

जोशी श्रीपाद / मी एक अनुवादक / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

डहाणूकर शरदिनी – वैद्य सरोजिनी / जागतिक मराठी परिषद : पुढे काय ? / नवभारत : दिवाळी, वर्ष ४२–४३; अंक ११–१२–०१ / सप्टें–ऑक्टो. १९८९.

डोंगरे ग. शं. / जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने (संपादकीय) / शिक्षण-समीक्षा नागपूर / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

तुळपुळे शं. गो. / मराठी कोरीव लेखांचा अभ्यास / समावेश : भाषा व साहित्य : संशोधन खंड ३ रा / संपा० डॉ. वसंत स. जोशी व प्रा. म. ना. अदवंत /

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / मे १९८९.

थत्ते यदुनाथ / अनुवाद : तारांबळ करणारा एक प्रकार / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

दादेगावकर पद्माकर / साहित्य अकादमी आयोजित राष्ट्रीय साहित्यानुवाद कार्यशाळा / पंचधारा, ३१ : ४, ३२ : १ / जाने–जून १९८९.

दावतर वसंत / मराठी, हिंग्राठी / 'ठाणे साहित्य संमेलन', १९८७ . १२ . ३१, १९८८ . ०१ . १–२–३. / पुनर्मुद्रण : आलोचना २८ : १ / सप्टें. १९८९.

दावतर वसंत / महाराष्ट्र आणि मराठी ( संपादकीय ) / आलोचना २८ : १ / सप्टें. १९८९.

दांडेकर वा. ना. / मराठी माध्यम : एक रडकथा / तरुण भारत (नागपूर) / १९८९ . ०८ . ०८.

दिब्रिटो फ्रान्सिस / वसईतील ख्रिस्ती बांधवांची मराठी अस्मिता / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

देऊळगावकर वि. पां. / अनुवाद – एक महत्त्वाची प्रक्रिया / साहित्यसूची १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

देव वसंत / अनुवाद कुणासाठी ? स्वत:साठी ! / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

देशपांडे दिनकर खंडेराव / मराठी उरिया कारक आणि विभक्ती / अनुबंध गलबर्गा, १३ : २, अंक ५० / जुलै–सप्टें. १९८९.

देशमुख उषा मा. / पाठसंशोधनशास्त्र / साहित्यसूची, १० : २ / मार्च १९८९.

देशमुख उषा मा. / साहित्यसंशोधन आणि भाषाबोली–विचार / साहित्यसूची १० : १ / फेब्रु. १९८९.

धोंगडे अश्विनी / करुणाष्टकें : एकभाषिक विश्लेषण / साहित्यसूची, १० : ५ / जून १९८९.

धोंगडे रमेश वा. / जागतिक मराठी परिषद कशासाठी ? / साप्ताहिक सकाळ, पुणे / १९८९ . ०८ . १८.

धोंगडे रमेश वा. / रामदासांची शैली / साहित्यसूची, १० : ५ / जून १९८९.

नाईक राजीव / शब्दांचा भूलभुलैया / महाराष्ट्र टाइम्स / १९८९ . ०८ . ०६ रविवार.

नारळीकर जयंत / विज्ञान, तंत्रज्ञान आणि मराठी भाषा / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

पटवर्धन माधव त्र्यंबक / 'आमचा साहित्य संसार'ला उत्तर / लोकशिक्षण, ८ : ४ / ऑक्टो. १९३७ / पुनर्मुद्रण : आलोचना, २८ : १ / सप्टें. १९८९.

पटवर्धन माधव त्र्यंबक / मराठीपण आणि संस्कृति / लोकशिक्षण, ७ : ५, नोव्हें. १९३६ / पुनर्मुद्रण : आलोचना, २८ : १ / सप्टें. १९८९.

पटवर्धन वा. ब. / देशभाषांची उपेक्षा / शिक्षण, शिक्षक, अभ्यासक्रम / आर्यभूषण, पुणे, १९०६ / पुनर्मुद्रण : आलोचना, २८ : १ / सप्टें. १९८९.

पदकी सरिता / माझी अनुवादगाथा / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

परांजपे प्र. ना. / भाषांतराचे मूल्यमापन / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

पागे शुभांगी / जागतिक मराठी परिषद / ललित / सप्टें. १९८९.

पाडळकर विजय / एका गावाची कहाणी / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें १९८९.

पासलकर राम श्री. / माझे अनुवाद प्रकाशन / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

पांढरे नीला / बृहन्महाराष्ट्राची मराठी साहित्यसेवा – वैशिष्ट्ये व मर्यादा / अनुबंध १३ : १. अंक ४९ / एप्रिल–जून १९८९.

पुरंदरे माधुरी / भाषांतर म्हणजे गालिचा / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

पुंडलिक शैलेश / शैलीविज्ञान : एक परिचय / परामर्श, ११ : २ / ऑग. १९८९.

पुंडे दत्तात्रय / महाराष्ट्राबाहेरील मराठीप्रेमी मंडळी / साप्ताहिक सकाळ /१९८९. ०८. १८

पोतदार दत्तो वामन / आधी मराठीचा पाया चांगला रचा / पुणे येथील शारदोपासक संमेलन, अधिवेशन पहिले, शके १८४७ त्रोटक अहवाल, प्रकाशक, वसंत भगवंत कर्णिक (चिटणीस), विजय पुणे १९२५ / पुनर्मुद्रण : आलोचना २८ : १, सप्टेंबर १९८९.

पोतदार दत्तो वामन / मराठी सार्वत्रिक व्हावी म्हणून / द्वितीय शारदोपासक संमेलन शके १८४८, स्वागताध्यक्षपदावरून केलेले भाषण, विद्यासेवक, ३ : ३ / मे १९२६ / पुनर्मुद्रण : आलोचना, २८ : १ / सप्टेंबर १९८९.

फडणीस विजया / अनुवाद प्रवृत्ति आणि गुजराती साहित्य / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

फाटक न. र. / मराठीचे उच्च शिक्षण / बडोदे वाङ्मयपरिषदेच्या अध्यक्षपदावरून केलेले भाषण / यशवंत, फेब्रुवारी १९४५ / पुनर्मुद्रण; आलोचना, २८ : १ / सप्टें. १९८९.

बडवे नीती / भाषांतरातील समस्या : माणिक, सांस्कृतिक / साहित्यसूची, १० :

९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

बागले प्रभाकर / 'जागतिक मराठी परिषदे'च्या निमित्ताने (संपादकीय) / अनुष्टुभ, १३ : १ / जुलै–ऑग. १९८९.

बांदिवडेकर चंद्रकांत / निजभाषा उन्नति अहै सब उन्नति को मूल / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

बुवा वि. आ. / प्रचलित मराठी आणि तिचे भवितव्य / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

बोबडे पु. वि. / मी केलेले अनुवाद / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

भवाळकर तारा / लोकसाहित्यविज्ञान आणि अन्य विज्ञानशाखा, लेखांक ३ रा / साहित्यसूची, ९ : १२ / जाने. १९८९.

भवाळकर तारा / लोकसाहित्य विज्ञान आणि अन्य विज्ञानशाखा, लेखांक ४ था / साहित्यसूची, १० : १ / फेब्रु. १९८९.

भवाळकर तारा / लोकसाहित्याच्या अभ्यासपद्धती, लेखांक ५ वा / साहित्यसूची, १० : २ / मार्च १९८९.

भवाळकर तारा / लोकसाहित्याच्या अभ्यासपद्धती, लेखांक ६ वा / साहित्यसूची, १० : ३ / एप्रिल १९८९.

भवाळकर तारा / लोकसाहित्याच्या अभ्यासपद्धती लेखांक ७ वा / साहित्यसूची, १० : ४ / मे १९८९.

भवाळकर तारा / लोकसाहित्याच्या संहितेचा अभ्यास / समावेश, भाषा व साहित्य संशोधन खंड ३ रा / संपा. डॉ. वसंत स. जोशी व प्रा. म. ना. अदवंत / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / मे १९८९.

भावे पुष्पा / घुसमटलेली मराठी / महाराष्ट्र टाइम्स / १९८९. ०८.०६ रविवार

भावे पुष्पा / मराठीतील प्रबोधनाचा ऱ्हास / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑग. १९८९.

महागावकर केशव / अनपेक्षितपणे अनुवाद क्षेत्रात / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

महाजनी विनीता / अनुवाद आरसा नव्हे, कॅमेरा / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

माधव मनोहर / माझे अनुवाद : पथ्यापथ्यविवेक / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

मंजूळ वा. ल. / माय मराठीची विदेशी लेकरे / रुची : मराठी भाषा विशेषांक / ऑग. १९८९.

मालशे मिलिंद स. / (अनु.) मानसिक प्रतिरूपण व भाषा / मूळ लेखक : नोम चॉम्स्की / अनुष्टुभ, १२ : ४ / जाने-फेब्रु. १९८९.

मुंडले आशा / स्त्रियांचा पुरुषाबद्दलचा आणि पुरुषांशी भाषाव्यवहार / समावेश : स्त्रीजीवनविषयक स्थित्यंतर पुणे परिसर ( १८७६-१९५० ) / भारतीय इतिहास संकलन समिती प्रकाशन विभाग, पुणे / १९८९.

मेश्राम भुजंग / गोंडी भाषेतील शब्दनिर्मितीची एक मीमांसा / समुचित, ६ : २ / एप्रिल-जून १९८९.

मेहता अनिल / अनुवादित पुस्तके – माझी भूमिका / साहित्यसूची, १० : ९-१० / ऑक्टो-नोव्हें. १९८९.

राईलकर मनोहर / अंक इंग्रजी नव्हेत, भारतीयच ! / रविवार सकाळ / १९८९. १०.०८

राजवाडे आशा / काव्याची भाषा / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, अंक २५० / जुलै-सप्टें. १९८९.

राजवाडे वि. का. / मराठी भाषा मुमूर्षु आहे काय ? / पुणे येथील शारदोपासक संमेलन, अधिवेशन पहिले, त्रोटक अहवाल शके १८४७, प्रकाशक वसंत भगवंत कर्णिक (चिटणीस) विजय १९२५. / पुनर्मुद्रण : आलोचना, २८ : १ / सप्टेंबर १९८९.

राजा शैलजा / अनुवाद आणि मी / साहित्यसूची, १० : ९-१० / ऑक्टो-नोव्हें. १९८९.

रिसबूड सरस्वती / ज्ञानसंवर्धनाचा / एक दुवा साहित्यसूची, १० : ९-१० / ऑक्टो-नोव्हें. ११८९.

लेले वामन केशव / अनुवाद काही विचार / साहित्यसूची, १० : ९-१० / ऑक्टो-नोव्हें. १९८९.

लेले वामन केशव (वा. के.) / जुन्या मराठी शब्दांचे पुनरुज्जीवन / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

वडोदरिया शरदेन्दू / आधुनिक मराठीवरील हिंदी आणि इंग्रजी भाषांचे आक्रमण / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

वर्टी आनंद / अनुवाद नव्हे अनुसर्जन / साहित्यसूची, १० : ९-१० / ऑक्टो-नोव्हें. १९८९.

वांगीकर मीना / अनुवाद – एक नाजूक कामगिरी / साहित्यसूची, १० : ९-१० / ऑक्टो-नोव्हें. १९८९.

वैद्य पु. ग. / इंग्रजी चांगले हवे, इंग्रजी माध्यम नको / रविवार सकाळ / १९८९. १०.०८

शांताराम (पुरोहित के. ज.) / अनुवादासंबंधी हितगुज / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

शिरवाडकर वि. वा. / भाषेसंबंधी प्रेम म्हणजे समाजाची जडणघडण करणाऱ्या महाशक्तीवरील प्रेम / लोकराज्य, जागतिक मराठी परिषद विशेषांक / १९८९. ०८. १६.

शेवाळकर राम / अनुवाद / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

श्रीकांत नारायण / वृत्तपत्र आणि अनुवाद / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

सरकार सुभाषचंद्र / सुशिक्षितांचे अडाणीपण आणि संस्कृतीवरील संकट / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

संगोराम श्रीरंग / रामदासी समर्थ वैखरी / साहित्यसूची, १० : ५ व ६ / जून १९८९ आणि जुलै १९८९.

साठे वसंत / मराठी राजकीय व आर्थिक व्यवहाराची भाषा व्हावी / लोकराज्य, जागतिक मराठी परिषद विशेषांक / १९८९. ०८. १६.

साधू अरुण / मराठी माणूस – प्रतिमा व वास्तवता / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

सारडा शंकर / अनुवाद : काही निरीक्षणे / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

साबडे भा. र. / मराठी माणसातील व्यापारी वृत्तीचा अभाव / रुची, मराठी भाषा विशेषांक / ऑगस्ट १९८९.

हळबे धनश्री / अनुवाद – मल्याळम् / साहित्यसूची, १० : ९–१० / ऑक्टो–नोव्हें. १९८९.

Almeida, Matthew, S. J. - A Description of Konkani, Panaji : Thomas Stephens Konkani Kendra, Mira Mar 403 001, pp xii, 338 Rs. 150.

Arjunwadkar S. K. - Western Influence on Marathi Grammatical Thought - New Quest, No. 76, July–August 1989.

Rege M. P. – A place for every Language and every Language in the place – New Quest, No. 76. July-August 1989.



अनुक्रमणिका

# मराठीसंबंधीचे अन्य लेखन १९८४–१९८८

कुलकर्णी दिनकर / 'कोंडुरा' : एक लोकतत्त्वीय अभ्यास / प्रतिष्ठान : लोक-साहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

कुलकर्णी सु. बा. / आदि आर्यांची संस्कृती / तरुण भारत (नागपूर) / १९८४ ०१ . २६.

कुलकर्णी सु. बा. / भारतीय लेखविद्या / तरुण भारत, ( नागपूर ) / १९८४. ११ . २५.

केळकर म. म. / आमच्या मायबोलीची कोण ही विटंबना ! / ( संपादकीय दृष्टिक्षेप) / वाङ्मयशोभा ४९ : ५८३–५८४ नोव्हें.–डिसें. / १९८७ : १–३.

कोळेकर वैदेही शरद / मराठी कहाण्यांचें स्वरूप आणि रचना–वैशिष्ट्य / प्रति-ष्ठान : लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

खेडेकर विनायक / लोकरंगकला : उद्‌गमापासून आविष्कारापर्यंत / प्रतिष्ठान लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

चंदावरकर मीना / भाषाकौशल्य. उमलती मुलं ( सदर ) / स्त्री जाने. १९८८.

जोशी श्री. बा. / भारतीय भाषेचा इंग्रजी अवतार / दीपावली, फेब्रु. १९६० / पुनर्मुद्रण : अपूर्व, १ : १० / फेब्रु–मार्च १९८६.

थिटे गणेश पंडित / वैदिक विज्ञान ( कौल लावणे ) / प्रतिष्ठान, लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

दावतर वसंत / ही 'अ' च्या अपूर्णोच्चाराची खूण आहे काय ? / आलोचना, २७ : ४ / डिसें. १९८८.

पाठक यशवंत / कीर्तनाचे सादरीकरण / प्रतिष्ठान, लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

फळदेसाई पांडुरंग रा. / गीतकथा : एक अध्ययन / प्रतिष्ठान, लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

भवाळकर तारा / लोकनाट्यातील धार्मिकता आणि लौकिकता / प्रतिष्ठान लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

भागवत वामन बा. / पाणिनीय व्याकरण आणि भाषा – तत्त्वज्ञान / मुंबई : महा-राष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ / १९८५. पृष्ठे. आठ, १७२.

रहाळकर गो. ह. / तांत्रिक वैज्ञानिक शिक्षण मराठीतूनच हवे / रविवार सकाळ, १९८८ . १० . १६.

वाकोडे मधुकर / भुलाई गीत प्रकार : स्वरूप व प्रेरणा / प्रतिष्ठान, लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.





अनुक्रमणिका

व्यवहारे शरद / लोकधर्मी नाटचाची जडणघडण / प्रतिष्ठान, लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

शेळके शांता ज. / शब्दांच्या सावल्या ( एकपानी ) / ललित, जाने. १९८४.

सोंथायमर गुंथर / लोकवाङ्मयाच्या अभ्यासाच्या दिशा / प्रतिष्ठान, लोकसाहित्य विशेषांक / जाने–ऑग. १९८८.

Dasgupta Propal / Sanskrit and Indian English, Some Linguistic Considerations / New Quest, Jan-Feb. 1988.

Kher P. R. / Cultural Interference in Translating Shakespeare's play into Marathi / New Quest / Jan-Feb. 1987.

Parshuraman T. / Marathi Diaect of Tamilnadu puppet artists ( called mandihar ) / University of Poona, Ph. D. dissertation / 1986, 11; 269 pp.

Introduction ( about the wondering tribes ); Phonology; Morphophonemis, Morphology, Syntax, Influence of Tamil Texts, ( Sample / Sentences, Vocabulary, Bibliography.

Patil Narendranath B. Cultural and unguistiz affirities of Marathi with Bengali / Lokarajya, 1887 . 01 . 26 p. 29-30,

Raina Anil / English Studies is India – Reappraisal New Quest, 70 / July-August 1988.

Shrivastav A. K. / on Translating liturature / New Quest, No. 61 Jan – Feb. 1987.

Sudhakar marathe / Ransom or mother's Debt ? / New Quest, No. 69, may - June 1988.

( Translation of the article in Bhasa ani Jeevan, 4 : 3, monsoon, 1986, translated by the author himself ).

Taksale B. G. / The Discovery of the national script of India / In responce to Script Reform Committee, Govt. of maharashtra, 1981 . 03 . 24, marathi Abstract : टाकसाळे लिपी : व्यंजनलेखनात सुधारणा, नवशक्ती ( मुंबई, दैनिक ), रविवार १९८१ . ०५ . ३१ पुरवणी १–३ ).

## महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने दरवर्षी मराठीतील भाषाविषयक लेखनास महाबँक पारितोषिक देण्यात येते. त्यासंबंधीचा परीक्षक मंडळाचा अहवाल खाली दिला आहे.

महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक

म. अ. परिषदेने महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिकासाठी खालीप्रमाणे परीक्षकांची समिती नियुक्त केली होती.

१ श्री. य. शं. कानिटकर

२ श्रीमती आशा मुंडले

३ डॉ. गं. ना. जोगळेकर निमंत्रक

या समितीने १९८६ व १९८७ अशा दोन वर्षांसाठीच्या पारितोषिकांसाठी ग्रंथनिवडीचे काम करावे असे ठरविण्यात आले होते.

त्यानुसार या समितीच्या वेळोवेळी बैठकी घेण्यात आल्या. १९८४ व १९८५ या वर्षांत प्रसिद्ध झालेले लेखन १९८६ च्या पारितोषिकासाठी १९८५ व १९८६ मधील लेखन १९८७ च्या पारितोषिकासाठी विचारात घेण्यात आले.

वरील कालावधीत प्रसिद्ध झालेले भाषाविषयक ग्रंथ, लेखसंग्रह, नियतकालिकातील सुटे लेख यांची पाहणी समितीनें केलीच; याशिवाय विद्यापीठातील टंकलिखित प्रबंध आणि अभ्यास परिषदेकडे आलेली हस्तलिखितेही विचारात घेतली. त्या त्या वर्षातील उपलब्ध साहित्याच्या गुणवत्तेची तौलनिक पाहणी करून परीक्षक समितीने महाबँक पारितोषिकांसाठी खालीलप्रमाणे निर्णय एकमताने घेतला आहे.

१. १९८६ चे पारितोषिक :

'मराठी भाषा आणि शैली' लेखक : रमेश धोंगडे आणि अश्विनी धोंगडे.
दिलीपराज प्रकाशन, पुणे, १९८५

२. १९८७ चे पारितोषिक :

'पाणिनीय व्याकरण आणि भाषा तत्त्वज्ञान' लेखक : व्याकरणरत्न पं. वामनशास्त्री बा. भागवत, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, ऑगस्ट १९८५

गं. ना. जोगळेकर
निमंत्रक, परीक्षक समिती

वरील पारितोषिकांच्या वितरणाचा समारंभ मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. के. ज. पुरोहित ऊर्फ शान्ताराम यांच्या अध्यक्षतेखाली मंगळवार दिनांक १८ एप्रिल १९८९ रोजी संध्याकाळी ६ वा. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सभागृहात आयोजित करण्यात आला होता. याप्रसंगी पुढील विद्वानांची पारितोषिकप्राप्त ग्रंथांचा परिचय करून देणारी भाषणे झाली.

१. डॉ. ग. बा. पळसुले – पाणिनीय व्याकरण आणि भाषातत्त्वज्ञान,

२. डॉ. श्रीधर गोखले – मराठी भाषा आणि शैली.

शेवटी अध्यक्षीय भाषण होऊन हा समारंभ समाप्त झाला. या निमित्तानें मराठीं अभ्यास परिषदेचे सदस्य आणि भाषाविषयक लेखनाबद्दल आस्था बाळगणारे अनेक अभ्यासक उपस्थित होते.

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक "मराठी अभ्यास परिषद" या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्या-तरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

अनुक्रमणिका